"ॐ श्रीपरमात्मने नमः"

# अथ दशमोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंत सातव्या अध्यायात आपल्या अंतःकरणातली गोष्ट विज्ञानासहित ज्ञान सांगू लागले होते. जेव्हा मध्यंतरीच आठव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाच्या प्रश्नाने आपली गोष्ट सांगण्यात अडथळा झाला तेव्हा भगवंतांनी पुन्हा विज्ञानासहित ज्ञान सांगण्यासाठी नवव्या अध्यायाचा विषय आरंभ केला आणि त्याची समाप्ती भगवत्परायणतेत केली. तरीही भगवंताच्या मनात आणखी सांगण्याचा भाव राहिला. त्यांना आपल्या वक्तव्यावर संतोष झाला नाही. जसे भक्ताला भगवंताची गोष्ट ऐकत असताना तृप्ती होत नाही (१०।१८). तसेच आपला आवडता भक्त अर्जुन याला आपल्या अंतःकरणातली गोष्ट सांगत असताना भगवंतासही तृप्ती होत नव्हती. कारण भगवंताच्या हृदयातील गोपनीय गोष्ट भक्ताशिवाय दुसरा कोणीही संसारात ऐकण्यास तयार नसतो. म्हणून भगवान् अर्जुनाने न विचारताच कृपापूर्वक दहाव्या अध्यायाचा विषय आरंभ करतात.*

*श्रीभगवानुवाच*

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया॥ १ ॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महाबाहो** | = हे महाबाहो अर्जुन! | **भूयः, एव** | = पुन्हा-पुन्हा | | ठेवणाऱ्या |
| **मे** | = माझ्या | **शृणु** | = ऐक | **ते** | = तुला |
| **परमम्** | = परम | **यत्** | = जे | **हितकाम्यया** | = हिताच्या कामनेने |
| **वचः** | = वचनाला (तू) | **अहम्** | = मी | **वक्ष्यामि** | = सांगेन. |
| | | **प्रीयमाणाय** | = माझ्यात अत्यंत प्रेम | | |

*व्याख्या*— **भूयः एव**—भगवंताच्या विभूतींना तत्त्वाने जाणून घेतल्याने भगवंताविषयी भक्ती निर्माण होते, प्रेम जागृत होते. म्हणून कृपेला वश होऊन भगवंतांनी सातव्या अध्यायात (आठव्यापासून बाराव्या श्लोकापर्यंत) कारणरूपाने सतरा विभूती आणि नवव्या अध्यायात (१६ व्यापासून १९ व्या श्लोकापर्यंत) कार्य-कारणरूपाने सदतीस विभूती सांगितल्या. आता येथे आणखीही विभूती सांगण्यासाठी* तसेच (८।१४,९।२२ आणि ३४ मध्ये सांगितलेल्या) भक्तीचे आणखीही विशेषतेने वर्णन करण्यासाठी भगवान् "**भूयः एव**" म्हणतात.

**शृणु मे परमं वचः**—भगवंताच्या मनात आपल्या महिमेचे वर्णन, आपल्या अंतःकरणातील गोष्ट, आपल्या प्रभावाचा विषय सांगण्याविषयी विशेष उत्सुकता दिसून येते. †म्हणून ते अर्जुनाला म्हणतात की "तू पुन्हा माझ्या परम वचनाला ऐक"

दुसरा भाव असा आहे की, भगवंत जेथे जेथे अर्जुनाला आपले विशेष महत्त्व, प्रभाव, ऐश्वर्य, इत्यादी दाखवितात अर्थात् स्वतःच स्वतःला प्रगट करतात, तेथे तेथे परम वचन, रहस्य, इत्यादी शब्दांचा प्रयोग करतात. जसे चौथ्या अध्यायात तीसऱ्या श्लोकात "**रहस्यं ह्येतदुत्तमम्**" पदांनी सांगतात की, ज्याने सूर्याला उपदेश केला होता, तोच मी तुझ्या रथाचे घोडे हाकीत तुझ्यासमोर बसलो आहे. अठराव्या अध्यायाच्या

* या (दहाव्या) अध्यायात भगवंतांनी चौथ्यापासून सहाव्या श्लोकापर्यंत आपल्या पंचेचाळीस विभूती सांगितल्या.

† भगवान् म्हणतात की, मी आपल्याकडून त्या भक्तावर कृपा करून त्यांना ज्ञान देतो—"तेषामेवानुकम्पार्थम्" (गीता १०।११) हे भगवंताचे परम वचन आहे.

चौसष्टाव्या श्लोकात "**शृणु मे परमं वचः**" पदांनी हे परम वचन सांगतात की, तू संपूर्ण धर्मांचा निर्णय करण्याच्या उठाठेवीला सोडून एक मला शरण ये, मी तुला संपूर्ण पापापासून मुक्त करीन, चिंता करू नकोस. (१८।६६). येथे "**शृणु मे परमं वचः**" पदांनी भगवंताचा आशय असा आहे की, प्राण्यांचे अनेक प्रकारचे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि माझ्या ठिकाणीच भक्तिभाव ठेवणारे सात महर्षी, चार सनकादी तसेच चौदा मनु हे सर्व माझ्या मनापासूनच उत्पन्न होतात. तात्पर्य सर्वांच्या मूळात मीच आहे.

जसे पुढे तेराव्या अध्यायात ज्ञानाची गोष्ट सांगत असतानासुद्धा चौदाव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी पुन्हा ज्ञानाचे वर्णन करण्याची प्रतिज्ञा केली आहे. तसेच सातव्या आणि नवव्या अध्यायात ज्ञान विज्ञानाचा विषय सांगत असतानासुद्धा, दहाव्या अध्यायाच्या आरंभी पुन्हा त्याच विषयाला सांगण्याची प्रतिज्ञा करतात. चौदाव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी "**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञान-मुत्तमम्**" म्हटले आणि जेथे (दहाव्या अध्यायाच्या आरंभी) "**शृणु मे परमं वचः**" म्हटले आहे. याचे तात्पर्य, ज्ञानमार्गात समज आणि विवेक-विचाराची मुख्यता राहते. म्हणून साधक वचनांना ऐकून विचारपूर्वक तत्त्वाला समजून घेतो. म्हणून तेथे "**ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्**" म्हटले आहे. भक्ति-मार्गात श्रद्धा-विश्वासाची मुख्यता राहते, म्हणून साधक वचनांना ऐकून श्रद्धा विश्वासपूर्वक मानून घेतो. म्हणून येथे "**परमं वचः**" म्हटले आहे.

**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया**—श्रोता वक्त्याविषयी श्रद्धा आणि प्रीती ठेवणारा असावा आणि वक्त्याच्या अंतःकरणात श्रोत्याविषयी कृपापूर्वक हित-भावना असावी, त्या वेळी वक्त्याचे वचन, त्याच्याद्वारा सांगितलेला विषय श्रोत्याच्या अंतःकरणात अटळरूपाने स्थिर होतो. यामुळे श्रोत्याची भगवंताचे ठिकाणी आपोआप रुची उत्पन्न होते, भक्ती आणि प्रेम निर्माण होते.

येथे "**हितकाम्यया**" पदातून एक शंका होते की, भगवंतांनी ठिकठिकाणी कामनेचा निषेध केला आहे, मग ते स्वतः आपल्या ठिकाणी कामना का ठेवतात? याचे समाधान असे आहे की, वास्तविक आपल्यासाठी भोग, सुख, आराम इत्यादी इच्छिणे हीच "कामना" आहे. दुसऱ्याच्या हिताची कामना "कामना" च नव्हे. दुसऱ्याच्या हिताची कामना तर त्याग आहे आणि आपली कामना समाप्त करण्याचे मुख्य साधन आहे. म्हणून भगवान् सर्वांना आदर्शरूपाने धारण करण्यासाठी म्हणत आहेत की, जसे मी हिताच्या कामनेने म्हणत आहे, तसेच सर्व माणसांनी प्राणीमात्राच्या हिताच्या कामनेनेच सर्वांशी यथायोग्य व्यवहार करावा. यामुळे आपली कामना समाप्त होईल आणि कामना समाप्त झाल्यावर माझी प्राप्ती सुगमतेने होईल. प्राणीमात्राच्या हिताची कामना ठेवणाऱ्यास माझ्या सगुण रूपाचीसुद्धा प्राप्ती होते. "**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः**" (१२।४) आणि निर्गुण स्वरूपाचीही प्राप्ती होत असते "**लभन्ते ब्रह्मनिर्वाणं...........सर्वभूतहिते रताः**" (५।२५)

**परिशिष्ट भाव**—सातव्या अध्यायात भगवंताने अत्यंत कृपापूर्वक आपल्याकडून विज्ञानासहित ज्ञान सांगणे आरंभ केले होते. मध्यंतरी अर्जुनाच्या प्रश्नामुळे आठवा अध्याय सुरू झाला. अर्जुनाच्या प्रश्नांनी उत्तरे समाप्त होताच भगवंताने पुन्हा तेच विज्ञानासहित ज्ञान सांगण्यासाठी नववा अध्याय आरंभ केला. नववा अध्याय सांगून झाल्यावरही भगवंताला संतोष झाला नाही आणि तेच विज्ञानासहित ज्ञान पुन्हा सांगण्यासाठी दहावा अध्याय आरंभ करतात. ही भगवंताची विशेष कृपा आहे. या अध्यायात भगवंताने त्या विज्ञानासहित ज्ञानाचे वेगळ्या पद्धतीने वर्णन केले आहे, ज्यात विभूतींचे अर्थात् आपल्या ऐश्वर्याचे वर्णन मुख्य आहे.

अर्जुन युद्ध क्षेत्रात येऊनही विजयाची कामना न ठेवता आपले कल्याण इच्छितात, म्हणून त्यांच्यासाठी '**महाबाहो**' संबोधन आले आहे. हे संबोधन अर्जुनाच्या श्रेष्ठतेचे, उपदेश धारण करण्याच्या सामर्थ्याचे, अधिकारतेचे सूचक आहे.

'**परमं वचः**'—संपूर्ण जीवांचे कल्याण करणारे असल्यामुळे भगवंताचे वचन 'परम' अर्थात् अत्यंत श्रेष्ठ आहे. संपूर्ण जीवांची कल्याण करणारी असल्यामुळेच गीता संपूर्ण विश्वाला प्रिय, विश्ववंद्य आहे.

'**वक्ष्यामि हितकाम्यया**'—अर्जुन जीवमात्राचे प्रतिनिधी आहेत आणि आपले हित इच्छितात.* म्हणून भगवान् त्यांच्या अर्थात् जीवमात्राच्या हिताच्या उद्देशाने परम वचन सांगतात. कल्याणाशिवाय जीवाचे दुसरे कोणते हितच नाही. भगवंताचे वचनसुद्धा कल्याण करणारे आहे आणि त्यांचा उद्देशही कल्याण करण्याचा आहे. म्हणून भगवंताच्या वाणीत जीवाचे कल्याण (परमहित) भरलेले आहे. जीवाचे हित जितके भगवान् करू शकतात तितके दुसरा कोणी करू शकत नाही—

* 'यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे' (गीता २।७)
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥ (गीता ३।२)
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्॥ (गीता ५।१)

**उमा राम सम हित जग माहीं। गुरु पितु मातु बंधु प्रभु नाहीं॥**

(मानस, किष्किंधा० १२। १)

दुसऱ्यांच्या वाणीत मतभेद राहतो, परंतु भगवंताची वाणी सर्वसम्मत, आहे. भगवान् योगात स्थित होऊन गीता सांगत आहेत.* म्हणून त्यांचे वचन विशेष कल्याण करणारे आहेत. भगवंताचे योगात स्थित होणे काय आहे? भगवान् सामान्यरूपाने सर्वच प्राण्यांचे परम सुहृद् आहेत. परंतु जेव्हा कोणी व्याकूळ होऊन त्यांना शरण येतो, तेव्हा भगवंताच्या हृदयात त्याच्या हिताचा विशेष भाव प्रकट होतो—हेच भगवंताचे योगात स्थित होणे आहे.† जसे वासरू समोर येताच गायीच्या शरीरात राहणारे दूध तिच्या स्तनांत येते!

'**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हित काम्यया**'—या पदांनी भगवान् म्हणतात की, तुझ्या अंत:करणात माझ्याविषयी प्रेमाचा भाव आहे आणि माझ्या अंत:करणात तुझ्या हिताचा भाव आहे. म्हणून ते विज्ञानासहित ज्ञान पुन्हा सांगेन, जे मी सातव्या आणि नवव्या अध्यायात सांगितले आहे. यावरुन सिद्ध होते की, सातव्या, नवव्या आणि दहाव्या तिन्ही अध्यायात भगवंताने प्राणी-मात्राच्या हिताच्या कामनेने आपल्या हृदयातील गोष्ट सांगितली आहे!

***संबंध***—*परम वचनाच्या विषयात जे मी पुढे सांगणार आहे, ते माझ्याशिवाय पूर्णपणे सांगणारा दुसरा कोणीही मिळू शकत नाही. याचे कारण काय आहे? हे भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः।
## अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः॥२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मे** | = माझ्या | **न** | = नाहीत (आणि) | **सर्वशः** | = सर्व प्रकाराने |
| **प्रभवम्** | = प्रकट होण्याला | **महर्षयः** | = महर्षिही | **देवानाम्** | = देवतांचा |
| | | **न** | = (जाणत) नाहीत. | **च** | = आणि |
| **सुरगणाः** | = देवताही | **हि** | = कारण | **महर्षीणाम्** | = महर्षिंचा |
| **विदुः** | = जाणत | **अहम्** | = मी | **आदिः** | = आदी आहे. |

***व्याख्या***— **न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः**— जरी देवतांचे शरीर, बुद्धी, लोक, सामुग्री इत्यादी सर्व दिव्य आहेत, तरीपण ते माझ्या प्रगट होण्याला जाणू शकत नाहीत. तात्पर्य, माझे जे विश्वरूपाने प्रगट होणे आहे, मत्स्य, कच्छ इत्यादीरूपाने प्रगट होणे आहे, सृष्टीत क्रिया, भाव आणि विभूतिरूपाने प्रगट होणे आहे, ह्या माझ्या प्रगट होण्याच्या उद्देशाला, ध्येयाला, हेतूंना देवताही पूर्णपणे जाणत नाहीत. माझ्या प्रकट होण्याला पूर्ण जाणणे तर दूर राहो, त्यांना तर माझे दर्शनही फार कठीणतेने होते. म्हणून ते माझ्या दर्शना-साठी नित्य उत्सुक असतात. (११।५२)

तसेच, ज्या महर्षींनी अनेक ऋचांना, मंत्रांना, विद्यांना, विलक्षण-विलक्षण शक्तींना प्रगट केले आहे, जे संसारातून उपरत झाले आहेत, जे दिव्यानुभवी आहेत, ज्यांना काहीही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे बाकी राहिले नाही, असे तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महर्षीलोकही माझ्या प्रगट होण्याला अर्थात् माझ्या अवतारांना, अनेक प्रकारच्या लीलांना, माझ्या माहात्म्याला पूर्णपणे जाणत नाहीत.

येथे भगवंतांनी देवता आणि महर्षी या दोघांचे नाव घेतले आहे. यावरुन असे दिसून येते की, उच्च पदाच्या दृष्टीने देवताचे नाव आणि ज्ञानाच्या दृष्टीने महर्षीचे नाव घेतले गेले आहे. या दोघांचे माझ्या प्रगट होण्याला न जाणण्याचे कारण हे आहे की, मी देवता आणि महर्षींचा

* न शक्यं तन्मया भूयस्तथा वक्तुमशेषत:॥
परं हि ब्रह्म कथितं योग युक्तेन तन्मया। (महाभारत आश्व० १६। १२-१३)
'(भगवान् अर्जुनाला म्हणाले—) ते सर्वच्या सर्व त्याच रूपात पुन्हा पुनरावृत्ती करणे आता माझ्या हातातील गोष्ट नाही. त्यावेळी योगयुक्त होऊनच मी परमात्मतत्त्वाचे वर्णन केले होते.'

† ब्रूयु: स्निग्धस्य शिष्यस्य गुरवो गुह्य मप्युत।

(श्रीमद्भा० १। १। ८, १०। १३। ३)

'गुरुजन आपल्या शिष्याला गुप्तातील गुप्त गोष्ट सुद्धा सांगत असतात.'
गूढ़उ तत्त्व न साधु दुरावहिं। आरत अधिकारी जहँ पावहिं॥ (मानस बाल० ११०। १)

सर्वप्रकाराने अनादी आहे. ''अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः''. त्यांचे ठिकाणी जी काही बुद्धी आहे, शक्ती आहे, सामर्थ्य आहे, पद आहे, प्रभाव आहे, महत्ता आहे, ती सर्व त्यांनी माझ्यापासूनच प्राप्त केली आहे. म्हणून माझ्यापासूनच प्राप्त केलेल्या प्रभाव, शक्ती, सामर्थ्य इत्यादी-द्वारा ते मला पूर्णपणे कसे जाणू शकतील ? अर्थात् जाणू शकत नाहीत. जसे बालक ज्या आईपासून उत्पन्न झाले आहे, त्या आईच्या विवाहाला आणि आपल्या शरीराच्या उत्पन्न होण्याला ते जाणत नसते. त्याचप्रमाणे देवता आणि महर्षी माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत. म्हणून ते माझ्या प्रगट होण्याला आणि आपल्या कारणाला जाणत नाहीत. कार्य आपल्या कारणात तर लीन होऊ शकते परंतु त्याला जाणू शकत नाही. त्याचप्रमाणे देवता आणि महर्षी माझ्यापासून उत्पन्न झाल्यामुळे, माझे कार्य असल्यामुळे कारणरूप असलेल्या मला जाणू शकत नाहीत, तर माझ्यात लीन होऊ शकतात.

तात्पर्य, देवता आणि महर्षी भगवंताच्या आदिला, अंताला आणि वर्तमानातील इयत्तेला अर्थात् भगवंत असेच आहेत, इतकेच अवतार घेतात—या परिमाणाला ते जाणू शकत नाहीत. कारण देवता आणि महर्षी यांच्या प्रगट होण्यापूर्वीही भगवंत जसेच्या तसे होते आणि ते लीन झाल्यावरही भगवान् जसेच्या तसेच राहतील. म्हणून ज्यांच्या शरीराचा आदि आणि अंत होत असतो, त्या देवता आणि महर्षी अनादी अनंताला अर्थात् असीम परमात्म्याला आपल्या सीमित बुद्धी, योग्यता, सामर्थ्य इत्यादीद्वारा कसे जाणू शकतात? असीमाला आपल्या सीमित बुद्धीच्या अंतर्गत कसे आणू शकतात? अर्थात् आणू शकत नाहीत.

याच अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात अर्जुनानेही भगवंतांना असे म्हटले आहे की, आपणाला देवता आणि दानव जाणत नाहीत. कारण देवतांजवळ भोग-सामुग्रीचे आणि दानवांजवळ माया-शक्तीचे बाहुल्य असते. तात्पर्य, भोगातच मग्न असल्याने देवतांना (मला जाणण्यासाठी) वेळच मिळत नाही आणि माया-शक्तीने छल-कपट करून दानव मला जाणूच शकत नाहीत.

**परिशिष्ट भाव—**सातव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंताने '**मनुष्याणां सहस्रेषु०**' पदांनी जी गोष्ट सांगितली होती ती येथे '**न मे विदुः**' पदांने सांगतात. ते भगवंताला का जाणत नाहीत—याचे कारण सांगतात की, मी सर्व प्रकाराने देवता आणि महर्षि यांचा आदी आहे. सातव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकातही भगवंताने म्हटले आहे की, भूत, भविष्य आणि वर्तमान यातील सर्व प्राण्यांना मी जाणतो परंतु मला कोणी जातात नाही. म्हणून अर्जुनानेही पुढे चौदाव्या-पंधराव्या श्लोकात म्हटले आहे की, आपल्याला देवताही जाणत नाहीत आणि दानवही जाणत नाहीत, तर आपण स्वतःच आपले-अपल्याने आपले-आपल्याला जाणता.

या श्लोकात भगवंताने '**राजगुह्य**' गोष्ट सांगितली आहे. भगवान् विद्या, बुद्धी, योग्यता, सामर्थ्य इत्यादींनी जाणले जात नाहीत, तर जिज्ञासूच्या श्रद्धा-विश्वासाने आणि भगवत्कृपेनेच जाणले जातात.

***संबंध—*** *पूर्व श्लोकात म्हटले गेले आहे की, देवता आणि महर्षीलोकही भगवंताच्या प्राकट्याला संपूर्णपणे जाणू शकत नाहीत, तर मग मनुष्य भगवंताला कसा जाणून घेईल आणि त्याचे कल्याण कसे होईल? याचा उपाय पुढील श्लोकात सांगत आहेत.*

# यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्।
# असम्मूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते॥ ३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो (मनुष्य) | | महान् ईश्वर | **मर्त्येषु** | = मनुष्यांमध्ये |
| **माम्** | = मला | **वेत्ति** | = जाणतो अर्थात् दृढतेने (संदेहरहित) स्वीकार करतो, | **असम्मूढः** | = ज्ञानवान् आहे (आणि) |
| **अजम्** | = अजन्मा | | | **सर्व पापैः** | = (तो) संपूर्ण पापांपासून |
| **अनादिम्** | = अनादि | | | | |
| **च,** | = आणि | | | | |
| **लोकमहेश्वरम्** | = संम्पूर्ण लोकांचा | **सः** | = तो | **प्रमुच्यते** | = मुक्त होतो. |

*व्याख्या*— **यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्—** मागील श्लोकात भगवंतांनी प्रगट होण्याला जाणण्याचा विषय सांगितला नाही. या विषयाला तर मनुष्यही जाणत नाही, परंतु जितके जाणून घेतल्याने आपले कल्याण होईल तितके तर तो

जाणूच शकतो. ते जाणणे अर्थात् मान्य करणे हे आहे की, भगवान् अज अर्थात् जन्मरहित आहेत; ते अनादी आहेत; अर्थात् हा जो काळ म्हटला जातो ज्यामध्ये आदि-अनादी शब्दांचा प्रयोग होतो; भगवान् त्या काळाचेही काळ आहेत. अशा कालातीत असणाऱ्या भगवंतात काळाचाही आदि आणि अंत होत असतो. भगवान् संपूर्ण लोकांचे महान् ईश्वर आहेत, अर्थात् स्वर्ग, पृथ्वी, पाताळ हे जे तीन लोक आहेत तसेच या तिन्ही लोकात जितके प्राणी आहेत आणि त्या प्राण्यावर शासन करणारे (वेगवेगळे अधिकार प्राप्त असणारे) जितके ईश्वर (मालक) आहेत त्या सर्व ईश्वरांचेही महान् ईश्वर भगवान् आहेत. अशा प्रकारे जाणून घेतल्याने अर्थात् श्रद्धा विश्वासपूर्वक दृढतेने मान्य केल्याने मनुष्याला भगवंताच्या अज, अविनाशी आणि लोकमहेश्वर असण्याविषयी कधी किंचित्‌ही संशय राहत नाही.

**असम्मूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते**—भगवंताला अज, अविनाशी आणि लोकमहेश्वर जाणून घेतल्याने मनुष्य पापापासून कसा मुक्त होईल? भगवान् जन्मरहित आहेत, नाशरहित आहेत अर्थात् त्यांचे ठिकाणी कधी किंचितही परिवर्तन होत नाही. ते अजन्मा तसेच अविनाशी राहत असूनही सर्वांचे महान् ईश्वर आहेत. ते सर्व देशात राहत असल्याने येथेही आहेत, सर्व समयात असल्याकारणाने आत्ताही आहेत, सर्वांचे असल्याने माझेही आहेत आणि सर्वांचे मालक असल्याने माझ्या एकट्याचेही मालक आहेत; अशा प्रकारे दृढतेने मान्य करावे. यात संशय मुळीच राहू नये. त्याचबरोबर हा जो क्षणभंगुर असलेला संसार ज्याचे प्रत्येक क्षणात परिवर्तन होत आहे आणि ज्याला ज्या क्षणात ज्या रूपाने पाहिले त्याला दुसऱ्या क्षणात त्या रूपाने कोणीही पुन्हा पाहू शकत नाही. कारण तो दुसऱ्या क्षणात तसा राहतच नसतो. अशाप्रकारे संसाराला यथार्थरूपाने जाणून घ्यावे. ज्याने आपल्यासह संपूर्ण संसाराचे मालक भगवंताला दृढतेने मान्य केले आहे आणि संसाराच्या क्षणभंगुरतेला तत्त्वाने योग्य जाणून घेतले आहे; त्याचे संसारात ''मी'' आणि ''माझे''- पण राहू शकत नाही तर केवळ भगवंताविषयीच आत्मीयता राहत असते. तर मग तो पापापासून मुक्त होणार नाही तर काय होईल? असा मूढतारहित मनुष्यच भगवंताला तत्त्वाने अज, अविनाशी आणि लोकमहेश्वर जाणतो आणि तोच सर्व पापापासून मुक्त होतो. त्याचे क्रियमाण, संचित इत्यादी संपूर्ण कर्म नष्ट होतात. मनुष्याला या वास्तविकतेचा अनुभव करण्याची गरज आहे, केवळ पोपटाप्रमाणे शिकण्याची आवश्यकता नाही. पोपटाप्रमाणे शिकलेले ज्ञान पूर्ण कामी येत नाही.

असम्मूढता म्हणजे काय ? संसार (शरीर) कोणाच्याही बरोबर कधी राहू शकत नाही तसेच कोणीही संसाराबरोबर कधी राहू शकत नाही आणि परमात्मा कोणापासूनही कधी वेगळे होऊ शकत नाहीत आणि कोणीही परमात्म्यापासून कधी वेगळे होऊ शकत नाही—ही वास्तविकता आहे. या वास्तविकतेला न जाणणेच सम्मूढता आहे आणि याला यथार्थ जाणून घेणेच असम्मूढता आहे. ही असम्मूढता ज्याचे ठिकाणी राहते तो मनुष्य असम्मूढ म्हटला जातो. असा असम्मूढ पुरुष माझ्या सगुण-निर्गुण, साकार-निराकार रूपाला तत्त्वाने जाणून घेतो त्यावेळी त्याला माझी लीला, रहस्य, प्रभाव, ऐश्वर्य इत्यादीत किंचिन्मात्रही संशय राहत नाही.

**परिशिष्ट भाव**—नवव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकात भगवंताने व्यतिरेक पद्धतीने म्हटले होते की, जो मला जाणत नाही त्याचे पतन होते आणि येथे अन्वय पद्धतीने म्हणत आहेत की, जो मला जाणतो, तो संपूर्ण पापांपासून मुक्त होतो.

येथे '**वेत्ति**' चा अर्थ आहे—दृढतापूर्वक, संदेहरहित स्वीकार करणे. कारण भगवंताला इंद्रिये-मन-बुद्धी यांनी जाणू शकत नाही (गीता १०।२). म्हणून भगवान् जाणण्याचे विषय नाहीत, तर मानण्याचा आणि अनुभव करण्याचा विषय आहेत. जाणण्याचा विषय स्वतः प्रकृतीही नाही, मग प्रकृतीहून पलीकडे असलेले भगवान् जाणण्याचा विषय कसे होऊ शकतात! अनुभव करण्याचे तात्पर्य आहे—स्वतःला भगवंतात लीन करून टाकणे, भगवंताशी अभिन्न होणे. भगवंताशी अभिन्न होऊनच भगवंताला जाणू शकतो. कारण आपण वास्तविक अभिन्नच आहोत. (त्याचप्रमाणे संसारापासून वेगळे होऊनच संसाराला जाणू शकतो कारण वास्तविक आपण वेगळेच आहोत).

महर्षिगण भगवंताच्या आदीला तर जाणू शकत नाहीत. परंतु ते भगवंताला अज-अनादी तर जाणतातच. भगवंताचा अंश असल्यामुळे जीवसुद्धा अज-अनादी आहे. म्हणून त्याने भगवंताला अज-अनादी जाणले तर स्वतःलाही तसाच (अज-अनादी) जाणेल. कारण जीव भगवंताशी अभिन्न होऊनच भगवंताला जाणतो. स्वतःला अज-अनादी जाणल्यावर तो मूढतारहित होतो. मग त्याच्यात पापे कशी राहतील? कारण पापे तर नंतर निर्माण झाली आहेत आणि तो अज-अनादी पूर्वीपासूनच आहे. '**सर्वपापैः प्रमुच्यते**' चे तात्पर्य आहे—गुणांच्या सांगापासून रहित होणे. गुणांचा संग राहिल्यास मनुष्य पापापासून मुक्त होऊ शकत नाही. कारण गुणांचा संग पापांचे मूळ कारण आहे.

पुढे चौथ्यापासून सहाव्या श्लोकापर्यंत असम्मूढतेचेच विवेचन झाले आहे, ज्यात भगवंताने स्वत:ला सर्वांचा 'आदि' सांगितले आहे. भगवान् स्वत: 'अनादि' आहेत आणि भावांचे व महर्षिंचे 'आदि' आहेत.

***संबंध***—*प्रथम श्लोकात भगवंतांनी ज्या परम वचनाला ऐकण्याची आज्ञा केली होती त्याला आता पुढील तीन श्लोकांत सांगतात.*

**बुद्धिर्ज्ञानमसम्मोहः क्षमा सत्यं दमः शमः।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च॥४॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः॥५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **बुद्धिः** | = बुद्धी, | **भवः** | = उत्पत्ती, | **यशः** | = यश |
| **ज्ञानम्** | = ज्ञान, | **अभावः** | = विनाश, | **च** | = आणि |
| **असम्मोहः** | = असम्मोह, | **भयम्** | = भय, | **अयशः** | = अपयश— |
| **क्षमा** | = क्षमा, | **अभयम्** | = अभय, | **भूतानाम्** | = प्राण्यांचे (हे) |
| **सत्यम्** | = सत्य, | **च** | = आणि | **पृथग्विधाः** | = अनेक प्रकारचे वेग-वेगळे |
| **दमः** | = दम, | **अहिंसा** | = अहिंसा, | | |
| **शमः** | = शम, | **समता** | = समता, | | |
| **एव** | = तसेच | **तुष्टिः** | = संतोष, | **भावाः** | = (वीस) भाव |
| **सुखम्** | = सुख, | **तपः** | = तप, | **मत्तः, एव** | = माझ्यापासूनच |
| **दुःखम्** | = दुःख, | **दानम्** | = दान, | **भवन्ति** | = होतात. |

***व्याख्या***— **बुद्धिः**—उद्देशाप्रमाणे निश्चय करणाऱ्या वृत्तीस "बुद्धी" म्हणतात—

**ज्ञानम्**—सार-असार, ग्राह्य-अग्राह्य, नित्य-अनित्य, सत्-असत्, उचित-अनुचित, कर्तव्य-अकर्तव्य असा जो विवेक अर्थात् वेगवेगळी माहिती असते त्याला "ज्ञान" म्हणतात. हे ज्ञान (विवेक) प्रत्येक मनुष्याला भगवंताकडून मिळालेले आहे.

**असम्मोहः**—शरीर आणि संसाराला उत्पत्ति-विनाशशील जाणत असूनही त्यांचे ठिकाणी "मी" आणि "माझे" पणा करण्याचे नाव सम्मोह आहे आणि याचे नसणे हे "असम्मोह" आहे.

**क्षमा**—कोणी आपला कितीही मोठा अपराध केला तरी, आपल्या ठिकाणी सामर्थ्य असूनही तो सहन करणे आणि त्या अपराध्याला आपल्याकडून अथवा ईश्वराकडून इहलोकी आणि परलोकी कुठेही शिक्षा होऊ नये असा विचार करण्याचे नाव "क्षमा" आहे

**सत्यम्**—सत्यस्वरूप परमात्म्याच्या प्राप्तीसाठी सत्य भाषण करणे अर्थात् जसे पाहिले, ऐकले आणि समजून घेतले, त्यानुसार आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून दुसऱ्याच्या हितासाठी न अधिक न कमी, जसेच्या तसे सांगणे याचे नाव सत्य आहे.

**दमः शमः**—परमात्मप्राप्तीचा उद्देश ठेवून इंद्रियांना आपापल्या विषयापासून परावृत्त करून आपल्या वशमध्ये करण्याचे नाव "दम" आहे आणि मनाला सांसारिक भोगाच्या चिंतनापासून परावृत्त करण्याचे नाव "शम" आहे

**सुखं दुःखम्**—शरीर, मन, इंद्रिय यांना अनुकूल परिस्थिती प्राप्त झाल्यावर अंत:करणात जी प्रसन्नता येते त्याचे नाव "सुख" आहे आणि प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली असता, अंत:करणात जी अप्रसन्नता होते, त्याचे नाव दु:ख आहे.

**भवोऽभावः**—सांसारिक वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, भाव इत्यादी उत्पन्न होण्याचे नाव "भव" आहे आणि या सर्वांचे लीन होण्याचे नाव "अभाव" आहे.

**भयं चाभयमेव च**—आपले आचरण, भाव इत्यादी शास्त्र आणि लोकमर्यादेविरुद्ध होण्यामुळे अंत:करणात आपले अनिष्ट होण्याविषयी जी एक शंका राहते त्याला "भय" म्हणतात. मनुष्याचे जर आचरण, भाव इत्यादी चांगले असतील, तो कोणाला कष्ट पोहचवीत नसेल, शास्त्र आणि सिद्धांताच्या विरुद्ध कोणते आचरण करत नसेल, तर त्याच्या अंत:करणात आपले अनिष्ट होण्याची शंका राहत नाही अर्थात् त्याला कोणाचेही भय नसते. यालाच "अभय"

म्हणतात.

**अहिंसा**—आपल्या तन, मन आणि वचनाने कोणत्याही देश, काल, परिस्थितीत कोणत्याही प्राण्याला किंचिन्मात्रही दु:ख न देणे ह्याला ''अहिंसा'' म्हणतात.

**समता**—निरनिराळ्या अनुकूल आणि प्रतिकूल वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, इत्यादी प्राप्त झाल्यावरही आपल्या अंत:करणात कोणती विषमता न येण्याचे नाव ''समता'' आहे

**तुष्टिः**—आवश्यकता अधिक असूनही कमी मिळाले, तर त्यात संतोष मानणे तसेच आणखी मिळावे अशी इच्छा न राहणे ''तुष्टि'' आहे. तात्पर्य मिळो अथवा न मिळो, कमी मिळो अथवा जास्त मिळो इत्यादी प्रत्येक परिस्थितीत प्रसन्न राहणे ''तुष्टि'' आहे.

**तपः**—आपल्या कर्तव्याचे पालन करत असताना जे काही कष्ट होतात, प्रतिकूल परिस्थिती येते, त्या सर्वांना प्रसन्नतेने सहन करणे म्हणजे ''तप'' आहे. एकादशी इत्यादी व्रत करणेही तप आहे.

**दानम्**—प्रत्युपकार आणि फलाची किंचिन्मात्र इच्छा न ठेवता प्रसन्नतेने आपल्या शुद्ध प्राप्तीचा हिस्सा सत्पात्राला देणे म्हणजे ''दान'' होय (१७।२०)

**यशोऽयशः**—मनुष्याचे चांगले आचरण, भाव आणि गुणांना अनुसरून संसारात जी नावाची प्रसिद्धी, प्रशंसा होत असते, त्याचे नाव ''यश'' आहे आणि दुराचरण, दुर्गुण, दुर्भाव यांना अनुसरून संसारात जी नावाची निंदा होते, तिला ''अयश'' (अपयश) म्हणतात.

**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः**—प्राण्यांचे हे वेगवेगळे आणि अनेक प्रकारचे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात अर्थात् त्या सर्वांना सत्ता, स्फूर्ती, शक्ती, आधार आणि प्रकाश माझा-लोकमहेश्वराचाच मिळत असतो. तात्पर्य तत्त्वाच्या दृष्टीने सर्वांच्या मूळात मीच आहे.

येथे ''**मत्तः**'' पदाने भगवंताचा योग, सामर्थ्य, प्रभाव, आणि ''**पृथग्विधाः**'' पदाने अनेक प्रकारच्या वेगवेगळ्या विभूती जाणाव्यात.

संसारात जे काही विहित तसेच निषिद्ध होत आहे, शुभ तसेच अशुभ होत आहे आणि संसारात जितके सद्भाव आणि दुर्भाव आहेत, ती सर्व भगवंताची लीला आहे—अशा प्रकारे भक्त भगवंताना तत्त्वाने समजून घेतो तेव्हा त्याचा भगवंताचे ठिकाणी अविकंप (अविचल) योग होत असतो. (१०।७)

याठिकाणी प्राण्यांचे जे वीस भाव सांगितले गेले आहेत त्यापैकी बारा भाव तर (एक एक) वेगवेगळे आहेत, आणि ते सर्व अंत:करणात उत्पन्न होणारे आहेत आणि भयाबरोबर आलेला अभयही अंत:करणात उत्पन्न होणारा भाव आहे; तसेच बाकीचे सात भाव परस्पर विरोधी आहेत. त्या पैकी भव (उत्पत्ती), अभाव, यश, आणि अयश ही चार तर प्राण्यांची पूर्वकृत कर्मांची फले आहेत आणि सुख-दु:ख तसेच भय ही तीन मूर्खपणाची फले आहेत. या मूर्खपणाला मनुष्य समाप्त करू शकतो.

या ठिकाणी प्राण्यांच्या वीस भावांना आपल्या-पासून उत्पन्न होणे आणि आपल्या विभूती सांगण्याविषयी भगवंताचे तात्पर्य हे वीस भाव तर वेगवेगळे आहेत परंतु या सर्व भावांचा आधार मात्र मी एकच आहे. या सर्वांच्या मूळात मीच आहे, हे सर्व माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि माझ्यापासूनच सत्ता-स्फूर्ती मिळवितात. सातव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकातही भगवंतांनी ''**मत्तः एव**'' पदांनी सांगितले आहे की, सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात अर्थात्, त्यांच्या मूळात मीच आहे. ते माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि माझ्यापासूनच सत्ता-स्फूर्ती मिळवितात. म्हणून येथेही भगवंताचा आशय विभूतींच्या मूळ तत्त्वाकडे साधकाची दृष्टी वळविण्याचा आहे.

## विशेष गोष्ट

साधकाने संसाराला कसे पहावे? असे पहावे की, संसारात ज्या काही क्रिया, पदार्थ, घटना इत्यादि आहेत, ते भगवंताचे रूप आहे. मग उत्पत्ती होवो अथवा प्रलय होवो, अनुकूलता होवो अथवा प्रतिकूलता होवो, अमृत असो अथवा मृत्यू असो, स्वर्ग असो अथवा नरक असो, ही सर्व भगवंताची लीला आहे. भगवंताच्या लीलेत बालकांडही आहे, अयोध्याकांडही आहे, अरण्यकांडही आहे आणि लंकाकांडही आहे. पुरीत पाहिले तर अयोध्यापुरीत भगवंताचे प्राकट्य आहे, राजा, राणी, आणि प्रजेचा वात्सल्य भाव आहे. जनकपुरीत श्रीरामाविषयी राजा जनक, महाराणी सुनयना आणि प्रजेचे विलक्षण भाव आहेत. ते श्रीरामाला जावईरूपाने खाऊ पिऊ घालतात, खेळवितात, विनोद करतात. वनात (अरण्यकांडात) भक्तांच्या भेटीही आहेत आणि राक्षसांचे मिळणेही आहे. लंकापुरीत युद्ध होते, हाणामारी होते, रक्ताच्या नद्या वाहतात. अशा प्रकारे वेगवेगळ्या पुरीत, वेगवेगळ्या कांडात भगवंताच्या निरनिराळ्या लीला आहेत. परंतु अनेक प्रकारच्या लीला होत असूनही त्या सर्व रामायणाची अंग आहेत आणि या सर्व अंगानी रामायण सांगोपांग झाले आहे. त्याचप्रमाणे संसारात प्राण्यांचे भाव निरनिराळे

आहेत, क्रिया आहेत. कुठे कोणी हसतो आहे तर कुठे कोणी रडत असतो, कुठे विद्वानांच्या चर्चा होत आहेत तर कुठे लढाई होत आहे, कोणी जन्माला येत आहे तर कोणी मरत आहे इत्यादी इत्यादी. ज्या विविध प्रकारच्या क्रिया होत आहेत त्या सर्व भगवंताच्या लीला आहेत. लीला करणारी ही सर्व भगवंताची रूपे आहेत. अशाप्रकारे भक्ताची दृष्टी नित्य भगवंतावरच असली पाहिजे, कारण ह्या सर्वाच्या मूळात एक परमात्मतत्त्वच आहे.

**परिशिष्ट भाव—** ज्ञानाच्या दृष्टीने तर सर्वच भाव प्रकृतीपासूनच होतात. परंतु भक्तीच्या दृष्टीने सर्वच भाव भगवंतापासूनच होतात. जर हे जीवाचे मानले तर जीवसुद्धा भगवंताची परा-प्रकृती असल्यामुळे भगवंताशी अभिन्न आहे. म्हणून हे भाव भगवंताचेच झाले. भगवंतात तर हे भाव निरंतर राहतात. परंतु जीवात अपराच्या संगामुळे येत—जात राहतात. भगवंतापासून उत्पन्न झाल्यामुळे सर्वच भाव भगवत्स्वरूपच आहेत.

**'पृथग्विधाः'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जसा हात एकच असतो परंतु त्याला वेग-वेगळी बोटे असतात, तसेच भगवान् एकच आहेत, परंतु त्यांच्यापासून प्रकट होणारे भाव वेग-वेगळे आहेत. एकाच भगवंतात अनेक प्रकारचे परस्पर विरुद्ध भाव एकाच वेळी राहतात.

## महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा।
## मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः॥ ६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सप्त** | = सात | **मनवः** | = चौदा मनू (—हे सर्वचे सर्व) | | (श्रद्धा-भक्ती ठेवणारे आहेत, |
| **महर्षयः** | = महर्षि (आणि) | **मानसाः** | = (माझ्या) मनापासून | **येषाम्** | = ज्यांची |
| **पूर्वे** | = त्यांच्याही पूर्वी असणारे | **जाताः** | = उत्पन्न झाले आहेत (आणि) | **लोके** | = संसारात |
| **चत्वारः** | = चार सनकादी | | | **इमाः** | = ही |
| **तथा** | = आणि | **मद्भावाः** | = माझ्यात भाव | **प्रजाः** | = संपूर्ण प्रजा आहे. |

***व्याख्या—*** [मागील दोन श्लोकात भगवंतांनी प्राण्यांच्या भावरूपाने वीस विभूती सांगितल्या. आता या श्लोकात व्यक्तीरूपाने पंचवीस विभूती सांगत आहेत, ज्या प्राण्यात विशेष प्रभावशाली आणि जगताला कारण आहेत.]

**महर्षयः सप्त—** जे दीर्घायू मंत्रद्रष्टे, ऐश्वर्यशाली, दिव्य-दृष्टी असणारे, गुण, विद्या इत्यादीत वृद्ध, धर्माला साक्षात करणारे आणि गोत्रांचे प्रवर्तक आहेत. अशा सातही गुणांनी युक्त ऋषी, सप्तऋर्षी म्हटले जातात.* मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ—हे सातही ऋषी उपर्युक्त सातही गुणांनी युक्त आहेत. हे सातही वेदवेत्ता आहेत, वेदांचे आचार्य मानले गेले आहेत, प्रवृत्ती धर्माचे संचालन करणारे आहेत आणि प्रजापतीच्या कार्यात नियुक्त केले गेलेले आहेत.† याच सात ऋषीना येथे "महर्षी" म्हटले गेले आहे.

**पूर्वे चत्वारः—** सनक, सनन्दन, सनत्कुमार आणि सनातन हे चारीही ब्रह्मदेवाच्या तप करण्याने सर्वात प्रथम प्रकट झालेले आहेत. हे चारीही भगवत्स्वरूप आहेत. सर्वात प्रथम प्रगट होऊनही, हे चारही नित्य पाच वर्षाच्या अवस्थेत बालकरूपानेच राहत असतात. हे तिन्ही लोकात भक्ती, ज्ञान आणि वैराग्याचा प्रचार करत फिरत असतात. यांच्या वाणीतून नित्य "**हरिः शरणम्**" याचा उच्चार होत असतो. ‡ हे भगवत्कथेंचे फार प्रेमी आहेत. म्हणून या चारापैकी एक वक्ता आणि तिघे श्रोता होऊन भगवत्कथा सांगत आणि ऐकत असतात.

**मनवस्तथा—** ब्रह्मदेवाच्या एका दिवसात (कल्पात) चौदा मनू होतात. ब्रह्मदेवाच्या वर्तमान कल्पाचे स्वायम्भुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुस, वैवस्वत, सावर्णि,

* सप्तैते सप्तभिश्चैव गुणैः सप्तर्षयः स्मृताः॥
दीर्घायुषो मन्त्रकृत ईश्वरा दिव्य चक्षुषः। वृद्धाः प्रत्यक्षधर्माणो गोत्रप्रवर्तकाश्च ये॥
(वायुपुराण ६१।९३-९४)

† मरीचिरङ्गिराश्चात्रिः पुलस्त्यः पुलहः क्रतुः। वसिष्ठ इति सप्तैते मानसा निर्मिता हि ते॥
एते वेदविदो मुख्या वेदाचार्याश्च कल्पिताः। प्रवृत्तिधर्मिणश्चैव प्राजापत्ये च कल्पिताः॥
(महा० शान्ति पर्व० ३४७।६९-७०)

‡ हरिः शरणमेवं हि नित्यं येषां मुखे वचः। (पद्मपुराणोक्त श्रीमद्भागवत् महात्म्य २।४८)

दक्ष सावर्णि, ब्रह्म सावर्णि, धर्म सावर्णि, रुद्र सावर्णि, देव सावर्णि आणि इंद्र सावर्णि नावाचे चौदा मनु आहेत.* हे सर्व ब्रह्मदेवाच्या आज्ञेने सृष्टीचे उत्पादक आणि प्रवर्तक आहेत.

**मानसा जाताः**—संपूर्ण सृष्टी भगवंताच्या संकल्पाने उत्पन्न होत असते. परंतु येथे सप्तऋषी इत्यादींना भगवंताच्या मनापासून उत्पन्न झाले असे म्हटले आहे. याचे कारण सृष्टीचा विस्तार करणारे असल्याने सृष्टीच्या उत्पत्तीत त्यांची मुख्यता असते. दुसरे कारण हे सर्व ब्रह्मदेवाच्या मनापासून अर्थात् संकल्पापासून उत्पन्न झालेले आहेत. स्वतः भगवान्‌च सृष्टीरचनेसाठी ब्रह्मदेवरूपाने प्रकट झाले आहेत. म्हणून सात महर्षी, चार सनकादी आणि चौदा मनु या पंचवीसांना ब्रह्मदेवाचे मानस पुत्र म्हटले जाते, अथवा भगवंताचे मानस-पुत्र म्हटले जाते. दोन्ही एकच गोष्ट आहे.

**मद्भावाः**—हे सर्व माझ्यातच भाव अर्थात् श्रद्धा-प्रेम ठेवणारे आहेत.

**येषां लोकमिमाः प्रजाः**—संसारात दोन प्रकारची प्रजा आहे. स्त्री-पुरुषाच्या संयोगाने उत्पन्न होणारी आणि शब्दाने (दीक्षा, मंत्र, उपदेश इत्यादी) उत्पन्न होणारी! संयोगाने उत्पन्न होणारी प्रजा ''बिन्दुज'' म्हटली जाते आणि शब्दाने उत्पन्न होणारी प्रजा ''नादज'' म्हणविली जाते. बिन्दुज प्रजा पुत्र परंपरेने आणि नादज प्रजा शिष्य परंपरेने चालत असते.

सप्तऋषी आणि चौदा मनु यांनी तर विवाह केला होता म्हणून त्यांचेपासून उत्पन्न झालेली प्रजा बिन्दुज आहे. परंतु सनकादिकांनी विवाह केलाच नाही म्हणून त्यांचा उपदेश प्राप्त करून पारमार्थिक मार्गात लागणारी प्रजा ''नादज'' आहे. निवृत्तीपरायण असणारे जितके संत महापुरुष पूर्वी झाले, आता आहेत आणि पुढे होतील ते सर्व उपलक्षणाने त्यांचीच नादज प्रजा आहे.

**परिशिष्ट भाव**—सात महर्षि, चार सनकादी तसेच चौदा मनू—हे सर्व भगवंताच्या मनापासून उत्पन्न झाल्यामुळे भगवंताशी अभिन्न आहेत.

*__संबंध__—चौथ्यापासून सहाव्या श्लोकापर्यंत प्राण्यांचे भाव आणि व्यक्तिरूपाने आपल्या विभूती आणि योगाचे (प्रभाव) वर्णन करून आता भगवान् पुढील श्लोकात त्यांना तत्त्वाने जाणण्याचे फल सांगतात.*

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः।**
**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः॥७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो मनुष्य | **तत्त्वतः** | = तत्त्वाने | **अविकम्पेन** | = अविचल |
| **मम** | = माझ्या | **वेत्ति** | = जाणतो अर्थात् दृढतापूर्वक (संदेह-रहित) स्वीकार करतो, | **योगेन** | = भक्तियोगाने |
| **एताम्** | = ह्या | | | **युज्यते** | = युक्त होतो, |
| **विभूतिम्** | = विभूतीला | | | **अत्र** | = यात (काहीही) |
| **च** | = आणि | | | **संशयः** | = संशय |
| **योगम्** | = योगाला (सामर्थ्याला) | **सः** | = तो | **न** | = नाही. |

*व्याख्या*—**एतां विभूतिं योगं च मम**—''एताम्'' सर्वनाम् अत्यंत जवळचे सुचविते. या ठिकाणी हा शब्द चौथ्यापासून सहाव्या श्लोकापर्यंत सांगितलेल्या विभूती आणि योगाना सुचवितो.

''विभूति'' म्हणजे भगवंताचे ''ऐश्वर्य'' आहे आणि ''योग'' भगवंताच्या अलौकिक विलक्षण शक्तीचे अनंत सामर्थ्याचे नाव आहे. तात्पर्य भगवंताच्या शक्तीचे नाव ''योग'' आहे आणि त्या योगापासून प्रगट होणाऱ्या विशेषतांचे नाव ''विभूति'' आहे. चौथ्यापासून सहाव्या श्लोकापर्यंत सांगितलेले भाव आणि व्यक्तीच्या रूपात जितक्या विभूती आहेत, त्या तर भगवंताच्या सामर्थ्याने, प्रभावाने प्रगट झालेल्या विशेषता आहेत आणि ''माझ्यापासून उत्पन्न होतात'' (**मत्तः, मानसा जाताः**) हा भगवंताचा योग आहे, प्रभाव आहे. यालाच नवव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात ''**पश्य मे योगमैश्वरम्**'' (माझ्या ह्या ईश्वरीय योगाला पहा) पदांनी म्हटले गेले आहे. तसेच पुढे अकराव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात अर्जुनाला विश्वरूप दाखवितेवेळी भगवंतांनी ''पश्य मे योगमैश्वरम्'' पदांनी आपला ऐश्वर्यमय

* (श्रीमद्भागवताच्या आठव्या स्कंधाच्या पहिल्या, पाचव्या आणि तेराव्या आध्यायात यांचे विस्ताराने वर्णन आले आहे)
ब्रह्मदेवाचा एक दिवस एक हजार चतुर्युगीचा असतो. त्यात एका मनुचे राज्य एकाहत्तर चतुर्युगीपेक्षा थोड्या अधिक समयाचे मानले गेले आहे. या वेळी ब्रह्मदेवाच्या आयुष्याचे एक्याण्णव वर्ष चालू आहे आणि यात सातव्या मनु ''वैवस्वत'' चे राज्य चालू आहे.

योग पाहण्यासाठी म्हटले आहे.

## विशेष संकेत

जेव्हा मनुष्य भोगबुद्धीने भोग भोगतो, भोगापासून सुख घेतो, तेव्हा आपल्या शक्तीचा ह्रास आणि भोग्यवस्तूचा विनाश होत असतो. अशाप्रकारे दोन्ही बाजूंनी हानी होत असते. परंतु जेव्हा तो भोगांना भोगबुद्धीने भोगत नाही अर्थात् त्याच्या अंतःकरणात भोग भोगण्याची थोडीही लालसा राहत नाही तेव्हा त्याच्या शक्तीचा ह्रास होत नाही. त्याची शक्ती, सामर्थ्य निरंतर कायम राहते.

वास्तविक भोगांच्या भोगण्यात सुख नसते. भोगाच्या संयमात सुख असते. हा संयम दोन प्रकारचा असतो. (१) दुसऱ्यावर शासनरूप संयम आणि (२) आपल्यावर शासन-रूप संयम. दुसऱ्यावर शासनरूप संयमाचे तात्पर्य ''दुसऱ्यांचे दुःख समाप्त व्हावे आणि ते सुखी व्हावेत'' या भावनेने दुसऱ्यांना उन्मार्गापासून परावृत्त करून सन्मार्गावर लावणे. आपल्यावर शासनरूप संयमाचे तात्पर्य ''आपल्या स्वार्थ तसेच अभिमानाचा त्याग करणे आणि स्वतः किंचिन्मात्रही सुख न भोगणे''. याच दोन्ही संयमाचे नाव ''योग'' अथवा ''प्रभाव'' आहे. असा योग अथवा प्रभाव परमात्म्याचे ठिकाणी संपूर्णपणे आणि स्वतः स्वाभाविक असतो. दुसऱ्यांच्या ठिकाणी हा साधन-साध्य आहे.

स्वार्थ आणि अभिमानाने दुसऱ्यावर शासन केल्याने, आपला हुकूम चालविल्याने दुसरा वशमध्ये होत असतो, त्यावेळी शासन करणाऱ्यास एक सुख होत असते. या सुखात शासकाची शक्ती, सामर्थ्य क्षीण होत असते आणि ज्याच्यावर तो शासन करतो तो पराधीन होत असतो. म्हणून स्वार्थ आणि अभिमानाने दुसऱ्यावर शासन करण्यापेक्षा स्वार्थ आणि अभिमानाचा संपूर्णपणे त्याग करून ''दुसऱ्यांचे हित व्हावे, मनुष्य नश्वर भोगात फसू नये. मनुष्य अनादिकालापासून अनंत दुःखांना भोगत आला आहे. म्हणून तो नेहमीसाठी या दुःखापासून मुक्त होऊन महान् आनंदाला प्राप्त व्हावा'' अशा बुद्धीने दुसऱ्यावर शासन करणे फार श्रेष्ठ आहे आणि विलक्षण शासन (संयम) आहे. या शासनाची अंतिम मर्यादा भगवंताचे शासन अर्थात् संयमन आहे. याचेच नाव ''योग'' आहे

योग म्हणजे समता, संबंध आणि सामर्थ्य. जे स्थिर परमात्मतत्त्व आहे, त्यापासूनच अपार सामर्थ्य येत असते. कारण ते निर्विकार परमात्मतत्त्व महान् सामर्थ्यशाली आहे. त्याच्यासारखे सामर्थ्य कोणात झाले नाही, होणार नाही आणि होऊच शकत नाही. मनुष्यात ते सामर्थ्य अंशिकरूपाने निष्काम झाल्यास येत असते. कारण कामनेने शक्तीचा क्षय होत असतो आणि निष्काम होण्याने शक्तीचा संचय होत असतो.

मनुष्य काम करता-करता थकून जातो त्यावेळी विश्राम घेतल्याने पुन्हा काम करण्याची शक्ती निर्माण होत असते. बोलता-बोलता थकतो त्यावेळी चुप बसण्याने पुन्हा बोलण्याची शक्ती येते. जगता-जगता मनुष्य मरून जातो तेव्हा त्याला पुन्हा जगण्याची शक्ती येते. सर्गात शक्ती क्षीण होते आणि प्रलयात शक्तीचा संचय होतो. तात्पर्य, प्रकृतीच्या संबंधाने शक्ती क्षीण होत असते आणि त्यापासून संबंध-विच्छेद झाल्यावर महान शक्ती प्राप्त होते.

**यो वेत्ति तत्त्वतः**—विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणण्याचे तात्पर्य, संसारात कारणरूपाने माझा जो काही प्रभाव, सामर्थ्य आहे आणि त्यापासून कार्यरूपाने प्रगट होणाऱ्या जितक्या विशेषता आहेत, अर्थात् वस्तू, व्यक्ती इत्यादीत जी काही विशेषता दिसत असते, प्राण्यांच्या अंतः-करणात प्रगट होणारे जितके भाव आहेत आणि प्रभावशाली व्यक्तीत ज्ञान-दृष्टीने, विवेक-दृष्टीने तसेच संसाराची उत्पत्ती आणि संचालनाच्या दृष्टीने जी काही विलक्षणता आहे त्या सर्वांच्या मूळात मीच आहे आणि मीच सर्वांचा आदि आहे. अशाप्रकारे मला जो समजून घेतो, तत्त्वाने बरोबर मान्य करतो, तर मग तो त्या सर्व विलक्षणतेच्या मूळात केवळ मलाच पाहतो. त्याचा भाव केवळ माझ्यातच असतो, व्यक्ती, वस्तूंच्या विशेषतेत नसतो. जसे सोनाराची नजर ज्या वेळी दागिन्यावर जाते त्यावेळी त्या दागिन्याचे नाव, आकृती, उपयोग यावर नजर असूनही अंतःकरणात हा भाव असतो की, तत्त्वाच्या दृष्टीने तर हे सर्व सोनेच आहे. त्याचप्रमाणे जेथे कोठे जी काहीही विशेषता दिसली, त्यावेळी दृष्टी भगवंताकडेच गेली पाहिजे की, त्यात जी काही विशेषता आहे ती भगवंताचीच आहे; वस्तू, व्यक्ती, क्रिया इत्यादीची नव्हे.

संसारात क्रिया आणि पदार्थ निरंतर परिवर्तनशील आहेत. यात जी काही विशेषता दिसते ती स्थायीरूपाने व्यापक परमात्म्याचीच आहे. जेथे जेथे विलक्षणता, अलौकिकता इत्यादी दिसेल, तेथे तेथे व्यक्ती, वस्तू इत्यादीचीच विलक्षणता मानल्याने मनुष्य त्यातच गुंतून पडतो आणि मिळत तर काही नाही. कारण वस्तूत जी विलक्षणता दिसत असते, ती त्या अपरिवर्तनशील परमात्मतत्त्वाचीच एक झलक असते, परिवर्तनशील वस्तूची नव्हे. अशाप्रकारे त्या मूळ तत्त्वाकडे दृष्टी जाणे हेच त्याला तत्त्वाने जाणणे अर्थात् श्रद्धेने दृढतापूर्वक मान्य करणे आहे.

येथे जे विभूतींचे वर्णन केले गेले आहे याचे तात्पर्य,

यात परिपूर्णरूपाने असलेल्या व्यापक परमात्म्याच्या ऐश्वर्याशी आहे. विभूतीच्या रूपात प्रगट होणारे संपूर्ण ऐश्वर्य परमात्म्याचे आहे. ते ऐश्वर्य परमात्म्याच्या योगशक्तीने! प्रगट झाले आहे, म्हणून ज्या कोणात जी काही विलक्षणता दिसेल, ती विलक्षणता भगवंताच्या योगशक्तीपासून प्रगट झालेल्या ऐश्वर्या (विभूती) चीच आहे, त्या वस्तूची नव्हे. अशा प्रकारे योग आणि विभूती परमात्म्याची झाली, तसेच त्या योग आणि विभूतींना तत्त्वाने जाणण्याचे तात्पर्य हे झाले की, त्यातील विलक्षणता परमात्म्याची आहे. म्हणून द्रष्ट्याची दृष्टी केवळ त्या परमात्म्याकडेच गेली पाहिजे, हेच यांना तत्त्वाने जाणून घेणे अर्थात् मान्य करणे आहे.*

**सोऽविकम्पेन योगेन युज्यते**—त्याची माझ्या ठिकाणी दृढ भक्ती होते. दृढ म्हणण्याचे तात्पर्य, त्याची माझ्याशिवाय कुठेही किंचिन्मात्रही महत्त्वबुद्धी राहत नाही. म्हणून त्याचे आकर्षण दुसऱ्याच्या ठिकाणी न होता एका माझ्याच ठिकाणी होत असते.

**नात्र संशयः**—यात काही संशय नाही हे म्हणण्याचे तात्पर्य, जर त्याला कुठेही किंचिन्मात्र संशय असेल तर त्याने मला तत्त्वाने मान्य केले नाही असे समजावे. कारण त्याने माझ्या योगाला अर्थात् विलक्षण प्रभावाला आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विभूतींना (ऐश्वर्यांना) माझ्यापासून वेगळे मानून महत्त्व दिले आहे.

मला तत्त्वाच्या दृष्टीने जाणून घेतल्यावर, त्याच्या समोर लौकिक दृष्टीने कोणत्याही प्रकारची विलक्षणता दिसून आली तर ती त्याच्यावर प्रभाव टाकू शकणार नाही. त्याची दृष्टी त्या विलक्षणतेकडे न जाता माझ्याकडेच जाईल. म्हणून त्याची माझ्या ठिकाणी स्वाभाविकच दृढ भक्ती होईल.

**परिशिष्ट भाव**—संसारात जी काही विलक्षणता (विशेषता) दिसून येते, ती सर्व भगवंताचा 'योग' अर्थात् विलक्षण प्रभाव, सामर्थ्य आहे. त्या विलक्षण प्रभावाने प्रकट होणारी विशेषता 'विभूति' आहे—अशाप्रकारे जो मनुष्य भगवंताच्या विभूतीला आणि योगाला तत्त्वाने जाणतो, त्याची भगवंतात दृढभक्ती होते. एका भगवंताशिवाय दुसरी सत्ता नाहीच—असे संदेहरहित दृढतापूर्वक स्वीकार करणे हेच तत्त्वाने जाणणे आहे. अशाप्रकारे तत्त्वाने जाणणाऱ्याला भगवंताने 'ज्ञानवान्' म्हटले आहे (गीता ७। १९).

'अविकम्प (अविचल) योग' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, तो भक्तियोग स्वतःही विचलत होत नाही आणि त्याला कोणीही विचलीत करू शकत नाही. कारण यात एका भगवंताशिवाय दुसरी कोणती वस्तूच नाही.

जसे रुपयांमुळे सर्व वस्तू मिळतात—असे मानून सामान्य माणूस रुपयांनाच महत्त्व देतो आणि त्याचे रुपयात आकर्षण होते. तसेच जो काही प्रभाव, महत्त्व दिसते ते सर्व भगवंताचेच आहे—असे जाणल्यामुळे मनुष्याची भगवंतात दृढ भक्ती निर्माण होते.

**'नात्र संशयः'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जर भगवंताशिवाय दुसरी सत्ता नाहीच तर मग यात संशय कसा होईल? यात संशय उत्पन्न होण्याला काही कारणच नाही. कारण येथे दोन सत्ता असतात तेथेच संशय उत्पन्न होतो. एका भगवंताशिवाय दुसरे काही नाहीच तर मग वृत्ती कुठे जाईल, का जाईल, कशात जाईल आणि कशी जाईल? म्हणून एका भगवंतातच अविचल भक्ती उत्पन्न होते—यात मुळीच संशय नाही.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, माझ्या विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणणारा अविचल भक्तीने युक्त होतो. म्हणून विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणणे म्हणजे काय? याचे विवेचन पुढील श्लोकात करीत आहेत.*

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः॥ ८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = मी | **प्रभवः** | = प्रभव (मूळ कारण) आहे, | **मत्तः** | = (आणि) माझ्यापासूनच |
| **सर्वस्य** | = संपूर्ण संसाराचा | | | **सर्वम्** | = संपूर्ण संसार |

* भक्तीचे प्रकरण असल्याने येथे ''तत्त्वतः वेत्ति'' (तत्त्वतः जाणणे) चा अर्थ ''तत्त्वतः मानणे'' च घेतला पाहिजे. कारण येथे भगवंतांनी ''तत्त्वतः वेत्ति'' चे फल, आपल्यात दृढभक्ती होते हे सांगितले आहे आणि पुढील श्लोकातही ''संपूर्ण संसाराचे मूळ कारण मीच आहे आणि सर्व संसार माझ्यानेच क्रिया करत असतो'' असे मानून (इति मत्वा) भजन करण्याविषयी म्हटले आहे.

जसे जाणणे दृढ असते तसेच मानणेही दृढ असते अर्थात् दृढ मान्यता तत्त्वज्ञानाप्रमाणेच फल देत असते. जसे ''मी हिन्दू आहे'', ''मी अमुक वर्णाचा आहे'' इत्यादी मान्यता जोपर्यंत स्व सोडत नाही, तोपर्यंत सुटत नाहीत. त्याचप्रमाणे ''या सर्व विभूतींच्या मूळात भगवानच आहेत'' ही मान्यता कधी नष्ट होत नाही. वर्ण, संप्रदाय इत्यादींची मान्यता खरी नव्हे तर, शरीराला धरून असल्याने प्राकृत असते आणि नष्ट होणारी असते. परंतु ''सर्वांच्या मूळात परमात्मा आहेत'' ही मान्यता खरी आहे, वास्तविक आहे. म्हणून ही मान्यता कधी नष्ट होत नाही तर ज्ञानात (तत्त्वाने जाणणे) परिणत होऊन ज्ञानस्वरूप होते.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रवर्तते** | = प्रवृत्त होत आहे अर्थात् क्रिया करीत आहे— | **मत्वा** | = मानून | **माम्** | = माझेच |
| **इति** | = असे | **भाव समन्विताः** | = माझ्यातच श्रद्धा-प्रेम ठेवून | **भजन्ते** | = भजन करतात— सर्व प्रकाराने मलाच शरण होतात. |
| | | **बुधाः** | = बुद्धिमान् भक्त | | |

***व्याख्या***— [पूर्व श्लोकातीलच गोष्ट या श्लोकात सांगितली गेली आहे **''अहं सर्वस्य प्रभवः''** यात ''सर्वस्य'' भगवंताची विभूती आहे अर्थात् पाहण्यात, ऐकण्यात, समजण्यात जे काही येत आहे, ती सर्वची सर्व भगवंताची विभूतीच आहे. ''**मत्तः सर्वं प्रवर्तते**'' यात ''**मत्तः**'' भगवंताचा योग (प्रभाव) आहे ज्यापासून सर्व विभूती प्रगट होतात. सातव्या, आठव्या, नवव्या अध्यायात जे काही सांगितले गेले आहे, ते सर्वच्या सर्व या श्लोकाच्या पूर्वार्धात आलेले आहे.]

**अहं सर्वस्य प्रभवः**—मानस, नादज, बिंदुज, उद्भिज, जरायुज, अंडज स्वेदज अर्थात् जड-चेतन स्थावर-जंगम यावन्मात्र जितके प्राणी उत्पन्न होतात त्या सर्वांच्या उत्पत्तीच्या मूळात परमपिता परमेश्वराच्या रूपात मीच आहे*

येथे ''**प्रभव**'' याचे तात्पर्य, मी सर्वांचा ''अभिन्न-निमित्तोपादानकारण'' आहे अर्थात् मी स्वतः च सृष्टिरूपाने प्रगट झालो आहे.

**मत्तः सर्वं प्रवर्तते**—संसारात उत्पत्ती, स्थिती, प्रलय, पालन, संरक्षण इत्यादी जितक्या काही क्रिया होत असतात, त्या सर्व माझ्यापासूनच होत असतात. मूळात त्यांना सत्ता-स्फूर्ती जी काही मिळत असते ती सर्व माझ्यापासूनच मिळत असते. जसे विजेच्या शक्तीने सर्व कार्य होतात, तसे संसारात जितक्या क्रिया होतात त्या सर्वांचे मूळ कारण मीच आहे.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते**—हे म्हणण्याचे तात्पर्य, साधकाची दृष्टी प्राणीमात्राचे भाव, आचरण, क्रिया इत्यादीकडे न जाता त्या सर्वांच्या मूळात स्थित असलेल्या भगवंताकडेच गेली पाहिजे. कार्य, कारण, भाव, क्रिया, वस्तू, पदार्थ, व्यक्ती इत्यादीच्या मूळात जे तत्त्व आहे, त्याच्या-कडेच भक्ताची दृष्टी राहिली पाहिजे.

सातव्या अध्यायाच्या सातव्या तसेच बाराव्या श्लोकात आणि दहाव्या अध्यायाच्या पाचव्या आणि या (आठव्या) श्लोकात ''**मत्तः**'' पद पुन्हा पुन्हा सांगण्याचे तात्पर्य हे, भाव, क्रिया, व्यक्ती इत्यादी सर्व भगवंतापासूनच उत्पन्न होतात, भगवंतातच स्थित राहतात आणि भगवंतातच लीन होतात. म्हणून तत्त्वाने सर्व काही भगवत्स्वरूपच आहे—ह्या गोष्टीला जाणून घ्या, अथवा मान्य करून घ्या, त्यामुळे भगवंताशी अविकम्प (कधी विचलित न केला जाणारा) योग अर्थात् संबंध होईल.

येथे ''**सर्वस्य**'', आणि ''**सर्वम्**'' असे दोन वेळा ''सर्व'' पद देण्याचे तात्पर्य, भगवंताशिवाय या सृष्टीचा कोणीही उत्पादक नाही आणि कोणी संचालकही नाही. या सृष्टीचे उत्पादक आणि संचालक केवळ भगवंतच आहेत.

**इति मत्वा भावसमन्विताः**—भगवंतापासूनच सर्व संसाराची उत्पत्ती होत असते आणि संपूर्ण संसाराला भगवंतापासूनच सत्ता-स्फूर्ती मिळत असते, अर्थात् स्थूल सूक्ष्म आणि कारणरूपाने सर्व काही भगवंतच आहेत—असे जे दृढतेने मान्य करून घेतात, ते ''भगवान्च सर्वोपरी आहेत, भगवंतासमान दुसरा कोणी झाला नाही, आत्ता नाही आणि पुढे होणार नाही तसेच होणे संभवही नाही'' अशा सर्वोच्च भावाने युक्त असतात. अशाप्रकारे जेव्हा त्यांची महत्त्वबुद्धी केवळ भगवंतातच होते, तेव्हा मग त्यांचे आकर्षण, श्रद्धा, विश्वास, प्रेम इत्यादी सर्व भगवंताच्या ठिकाणीच होत असते. भगवंताचाच आश्रय घेतल्याने त्यांचे ठिकाणी समता, निर्विकारता, निःशोकता, निश्चिंतता, निर्भयता, इत्यादी स्वतः स्वाभाविकच येत असतात. कारण जेथे देव (परमात्मा) असतात तेथे दैवी संपत्ती स्वाभाविकच येत असते.

**बुधाः**—भगवंताशिवाय इतरांची सत्ताच न मानणे, भगवंतालाच सर्वांचे मूळ मानणे, भगवंताचाच आश्रय घेऊन त्यांच्याच ठिकाणी श्रद्धा-प्रेम ठेवणे—हीच त्यांची बुद्धिमानी आहे. म्हणून त्यांना बुद्धिवान् म्हटले गेले आहे. याच गोष्टीला पुढे पंधराव्या अध्यायाच्या आठराव्या एकोणीसाव्या श्लोकात असे म्हटले आहे की, जो मला क्षराहून (संसारमात्र) अतीत आणि अक्षरापेक्षा (जीवात्मा) उत्तम असे जाणतो तो सर्ववित् आहे आणि सर्वभावाने माझेच भजन करत असतो.

---

* जसे सातव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात भगवंतांनी आपल्याला अपरा आणि परा प्रकृतीचे कारण म्हटले आहे आणि चौदाव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात आपल्याला बीज प्रदान करणारा पिता म्हटले आहे. तसेच येथे भगवंतांनी आपल्याला सर्वांचा उत्पादक म्हटले आहे.

**माम् भजन्ते**—भगवंताच्या नावाचा जप करणे, कीर्तन करणे, भगवंताच्या रूपाचे चिंतन करणे, ध्यान करणे, भगवंताची कथा श्रवण करणे, भगवत्संबंधी ग्रन्थांचे (गीता, रामायण, भागवत इत्यादी) पठन-पाठन करणे, हे सर्वच्या सर्व भजन आहे. परंतु खरे भजन तर ते आहे, ज्यामध्ये अंत:करण भगवंताकडे ओढले जाते, केवळ भगवंतच आवडू लागतात. भगवंताची विस्मृती बोचत असते, खटकते. अशाप्रकारे भगवंतात तल्लीन होणे हेच खरे भजन आहे.

**विशेष विवेचन**

सर्वांच्या मूळात परमात्मा आहेत आणि परमात्म्यापासूनच वस्तू, व्यक्ती, पदार्थ, घटना इत्यादी सर्वांना सत्ता स्फूर्ती मिळत असते—असे ज्ञान होणे हे, परमात्मप्राप्तीची इच्छा करणाऱ्या सर्व साधकांसाठी फार आवश्यक आहे. कारण जर सर्वांच्या मूळात परमात्माच आहेत, तर साधकाचे लक्ष परमात्म्याकडेच केंद्रित झाले पाहिजे. त्या परमात्म्याकडे लक्ष वेधण्यासाठीच संपूर्ण विभूती आणि योगाच्या ज्ञानाचे तात्पर्य आहे. हीच गोष्ट गीतेत ठिकठिकाणी सांगितली गेली आहे. जसे, ज्याच्यापासून संपूर्ण प्राण्यांची प्रवृत्ती होत असते आणि ज्याने संपूर्ण संसार व्याप्त झालेला आहे, त्या परमात्म्याचे आपल्या कर्तव्यकर्माद्वारे पूजन केले पाहिजे. (१८।४६) जो संपूर्ण प्राण्यांच्या अंत:करणात विद्यमान आहे आणि जो सर्व प्राण्यांना प्रेरणा देतो, त्या परमात्म्याला सर्वभावाने शरण गेले पाहिजे (१८।६१-६२) इत्यादी. कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग—ही साधने तर आपापल्या रुचीनुसार भिन्न-भिन्न असू शकतात, परंतु उपर्युक्त ज्ञान सर्व साधकांसाठी असणे अत्यंत आवश्यक आहे.

**परिशिष्ट भाव**—लोक रुपयांना यासाठी महत्त्व देतात की, त्याने सर्व वस्तू मिळू शकतात. रुपयांमुळे वस्तू मिळतात, उत्पन्न होत नाहीत. परंतु भगवंतापासून सर्व वस्तू उत्पन्नही होतात आणि मिळतातही! अशाप्रकारे जे भगवंताच्या माहात्म्याला जाणतात ते तुच्छ रुपयांच्या लोभात न फसता भगवंताच्याच भजनात लागतात—'**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत**' (गीता १५।१९).

भगवान् म्हणतात की, पदार्थ आणि व्यक्तीही माझ्यापासूनच उत्पन्न होतात. ( **अहं सर्वस्य प्रभवः** ). आणि क्रियाही माझ्यापासूनच होतात ( **मत्तः सर्वं प्रवर्तते** ). परंतु जीव पदार्थ आणि क्रिया यांच्याशी संबंध जोडून त्यांना आपले मानून त्यांचा भोक्ता आणि कर्ता होऊन बांधला जातो. भोक्ता बनल्यामुळे पदार्थ बंधनकारक होतात आणि कर्ता बनल्याने क्रिया बंधनकारक होतात. जर जीव भोक्ता आणि कर्ता बनला नाही तर बंधन नाहीच.

संसारात जो काही प्रभाव दिसून येतो तो सर्व भगवंताचाच आहे—ही गोष्ट भगवंताने गीतेत '**मत्तः**' पदाने कित्येक ठिकाणी सांगितली आहे. जसे—

'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**' (७।७)
'माझ्याशिवाय या संसाराचे दुसरे कोणी किंचिन्मात्रही कारण आणि कार्य नाही.'
'**मत्त एवेति तान्विद्धि**' (७।१२)
'हे (सात्त्विक, राजस आणि तामस) भाव माझ्यापासूनच होतात—असे त्यांना समजा'.
'**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः**' (१०।५)
'प्राण्यांचे हे (बुद्धी, ज्ञान, असम्मोह इत्यादी) अनेक प्रकारचे वेग-वेगळे भाव माझ्यापासूनच होतात.'
'**मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च**' (१५।१५)
'माझ्यापासूनच स्मृती, ज्ञान आणि अपोहन (संशय इत्यादी दोषांचा नाश) होत असतो.'

***संबंध**—आता पुढील श्लोकात त्या भक्तांचे भजन कोण्या पद्धतीने होत असते, ते सांगत आहेत.*

## मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्।
## कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च*॥९॥

**मच्चित्ताः** = माझ्यात चित्त लावणारे
**मद्गतप्राणाः** = मला प्राण अर्पण करणारे (भक्तजन)
**परस्परम्** = आपसात
**बोधयन्तः** = (माझ्या गुण, प्रभाव इत्यादीची) जाणीव देत
**च** = आणि

* या श्लोकात सहा गोष्टी आहेत. त्या पैकी "मच्चित्ताः" आणि "मद्गतप्राणाः" ह्या दोन गोष्टी स्वत: करण्याच्या आहेत अर्थात् भक्त स्वत: स्वतंत्रतेने असे बनतात, "बोधयन्तः" आणि "कथयन्तः" ह्या दोन गोष्टी आपसात भेटल्यावर होत असतात. तसेच "तुष्यन्ति" आणि "रमन्ति" ह्या दोन गोष्टी फलरूपाने मिळतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **कथयन्तः** | = त्यांचे कथन करीत | **तुष्यन्ति** | = संतुष्ट राहतात | **माम्, च** | = माझ्यावरच |
| **नित्यम्** | = नित्य-निरंतर | **च** | = आणि | **रमन्ति** | = प्रेम करतात |

**व्याख्या**— [भगवंतापासूनच सर्व उत्पन्न झाले आहेत आणि भगवंतामुळेच सर्व क्रिया होत आहेत अर्थात् सर्वांच्या मूळात परमात्मा आहेत—ही गोष्ट ज्यांना दृढतेने आणि निःसंशय पटली आहे त्यांच्यासाठी काहीही करणे, जाणणे आणि मिळविणे बाकी राहत नाही. बस! त्यांचे एकच काम राहते—सर्व प्रकाराने भगवंतातच लागून राहणे. हीच गोष्ट या श्लोकात सांगितली आहे]

**मच्चित्ताः**—ते माझ्या ठिकाणी चित्त ठेवणारे आहेत. एक स्व चे भगवंतात व्यस्त होणे असते आणि दुसरे चित्ताचे भगवंताकडे वळवणे असते. ज्या वेळी "मी भगवंताचा आहे" असे समजून स्व भगवंताचे ठिकाणी लागतो, त्यावेळी चित्त, बुद्धी, इत्यादी सर्व सहज भगवंतात लागतात, कारण कर्ता (स्व) च व्यस्त झाल्यास करण (मन, बुद्धी इत्यादी) वेगळे थोडेच राहतील? तेही तिकडेच वळतील. करण वळले तरी कर्ता वेगळा राहू शकतो परंतु कर्ता व्यस्त झाल्यास करण वेगळे राहू शकत नाही. जेथे कर्ता राहील तेथेच करणही राहतील. कारण करण कर्त्याचे अधीन असते. कर्ता स्वतः जेथे व्यस्त होतो तेथेच करणही राहते. जसा एखादा मनुष्य परमात्मप्राप्तीसाठी शुद्ध अंतःकरणाने साधक होतो, तेव्हा साधनेत त्याचे मन सहज वळते. त्याचे मन साधनाशिवाय इतर कोणत्याही कार्याकडे झेप घेत नाही आणि ज्या कार्याकडे वळते ते कार्य भगवंताचेच असते. कारण जेथे स्व कर्ता असतो, तेथे स्व (कर्त्याच्या) विरुद्ध मन, बुद्धी वळत नाहीत. परंतु जेव्हा स्व भगवंताचे ठिकाणी व्यस्त होत नाही तर "मी तर संसारी आहे", "मी तर गृहस्थी आहे" अशा प्रकारे स्व ला संसाराकडे वळवून चित्ताला भगवंताकडे प्रवृत्त करू इच्छितो, त्या वेळी त्याचे चित्त भगवंताचे ठिकाणी निरंतर स्थिर राहत नाही. तात्पर्य, स्व संसारी बनून राहील आणि चित्त भगवंताकडे वळवू इच्छिल तर चित्त भगवंताचे ठिकाणी स्थिर होणे जणू असंभवच आहे.

दुसरी गोष्ट, चित्त तिथेच केंद्रित होते जिथे प्रियता असते. प्रियता त्याच ठिकाणी होते ज्या ठिकाणी आपुलकी असते, आत्मीयता असते. भगवंताशी स्व चा संबंध जोडल्याने आत्मीयता होत असते. "मी केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवंतच माझे आहेत. शरीर-संसार माझा नाही. माझ्यावर भगवंताचा पूर्ण अधिकार आहे म्हणून ते माझ्यासाठी आपल्या इच्छेनुरूप कशीही वर्तणूक, कोणतेही विधान करू शकतात. परंतु माझा भगवंतावर काहीही अधिकार नाही, अर्थात् ते माझे आहेत तर, मी जसे इच्छिल तसेच त्यांनी करावे असा कोणताही माझा अधिकार नाही" अशाप्रकारे जो स्व ला भगवंताचे मानतो, स्वतः भगवंताला अर्पित होतो, त्याचे चित्त आपोआप भगवंताचे ठिकाणी रममाण होते. अशा भक्तांनाच येथे "**मच्चित्ताः**" म्हटले गेले आहे.

येथे "**मच्चित्ताः**" पदात चित्ताच्या अंतर्गतच मन येते, अर्थात् मनोवृत्ती वेगळी नाही. गीतेत चित्ताला आणि मनाला एकही म्हटले आहे आणि वेगळेही म्हटले आहे. जसे "**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च**" (७।४) येथे मनाच्या अंतर्गतच चित्त आहे आणि "**मनः संयम्य मच्चित्तः**" (६।१४) या ठिकाणी मन आणि चित्त वेगळे आहे. परंतु या श्लोकात आलेल्या "**मच्चित्ताः**" पदात मन आणि चित्त एकच आहे, दोन नव्हे.

**मद्गतप्राणाः**—त्यांचे प्राण मलाच अर्पण झालेले आहेत. प्राणांत दोन गोष्टी आहेत—जगणे आणि क्रिया. त्या भक्तांचे जगणेही भगवंतासाठीच असते आणि शरीराच्या संपूर्ण क्रियाही भगवंतासाठीच असतात. शरीराच्या जेवढ्या क्रिया असतात, त्यात प्राणाची मुख्यता असते. म्हणून त्या भक्तांच्या यज्ञ, अनुष्ठान इत्यादी शास्त्रीय, भजन-ध्यान, कथा-कीर्तन, इत्यादी भगवत्संबंधी, खाणे-पिणे इत्यादी शारीरिक, शेती, व्यापर इत्यादी जीविकासंबंधी, सामाजिक सेवा संबंधी इत्यादी इत्यादी जितक्या क्रिया होतात, त्या सर्व भगवंतासाठीच होतात. त्यांच्या क्रियेत क्रियाभेद तर होत असतो, परंतु उद्देशभेद होत नाही. त्यांच्या सर्व क्रिया एका भगवंताच्या उद्देशानेच होतात. म्हणून ते "भगवद्गत-प्राण" असतात.

ज्याप्रमाणे "गोपीगीत" यात गोपिकांनी भगवंताला म्हटले आहे की, आम्ही आमचे प्राण आपणास अर्पण केले आहेत "**त्वयि धृतासवः**" (श्रीमद्भा० १०।३१।१) त्याप्रमाणे भक्तांचे प्राण केवळ भगवंतात राहतात त्यांची भगवंताशी जितकी आत्मीयता असते, तितकी स्वतःच्या प्राणाशीही नसते. प्रत्येक प्राण्याला "कोणत्याही अवस्थेत माझे प्राणोत्क्रमण होऊ नये" अशाप्रकारची जगण्याची इच्छा राहत असते. हा प्राणाचा मोह आहे, स्नेह आहे. परंतु भगवंताच्या भक्ताला प्राणाचा मोह राहत नाही. त्यांना "आपण जिवंत रहावे" अशी इच्छा नसते आणि मृत्यूचे भयही नसते. त्यांचा जिवंत राहण्याशीही मतलब नसतो आणि मरण्याशीही

मतलब नसतो. त्यांचा तर केवळ भगवंताशीच मतलब असतो. कारण ते या गोष्टीला उत्तम तऱ्हेने जाणून घेतात की, मृत्यूने प्राणाचाच वियोग होत असतो, भगवंताशी तर कधी वियोग होतच नाही. प्राणाशी आपला संबंध नाहीच. परंतु भगवंताशी आपला घनिष्ठ स्वत:सिद्ध संबंध आहे. प्राण प्रकृतीचे कार्य आहे आणि आपण स्वत: भगवंताचे अंश आहोत.

असे "**मद्गतप्राणा:**" होण्यासाठी साधकाने सर्व प्रथम हा उद्देश बनविला पाहिजे की, आपणाला तर भगवत्प्राप्तीच करावयाची आहे. सांसारिक वस्तू प्राप्त होवोत अथवा न होवोत, आपण स्वस्थ राहो अथवा आजारी राहो, आपला आदर होवो अथवा निरादर, आपल्याला सुख मिळो अथवा दु:ख मिळो—याविषयी आपल्याला काहीही कर्तव्य नाही. आपल्याला कर्तव्य तर केवळ भगवंताशी आहे. असा दृढ उद्देश बनल्यावर साधक "भगवद्गतप्राण" होईल.

**बोधयन्त: परस्परम्**—त्या भक्तांना भगवद्भाव असणारे, भगवद्रुची असणारे जेव्हा भेटतात, तेव्हा त्यांच्यात भगवत्संबंधी चर्चा होते मग ते परस्परात एक दुसऱ्याला भगवंताचे तत्त्व, रहस्य, गुण, प्रभाव, इत्यादी जाणवून देतात, तेव्हा एक विलक्षण सत्संग होत असतो*. जेव्हा ते आपसात भावपूर्वक चर्चा करतात तेव्हा त्यांच्या अंत:करणात भगवत्संबंधी विलक्षण विलक्षण भाव आपोआप येऊ लागतात. जसे दिव्याच्या खाली अंधार असतो, परंतु दोन दिवे एक दुसऱ्या समोर जर ठेवले तर त्या दोन्ही दिव्याच्या खालचा अंधार नाहीसा होतो. त्याचप्रमाणे दोन भगवद्भक्त एकाच वेळी एकमेकाला भेटतात आणि भगवच्चर्चा सुरू होते, तेव्हा कोणाच्या मनात एखादा भगवत्संबधी विशेष भाव निर्माण झाला तर तो दुसऱ्यासमोर प्रगट करतो. तसेच दुसऱ्याच्या मनात वेगळ्या प्रकारचा भाव प्रगट झाला तर तोही त्याला प्रगट करतो. अशा तऱ्हेने त्यांच्या भावांचे आदान-प्रदान झाल्याने त्यांच्यात नवे-नवे भाव प्रगट होतात. परंतु एकटाच भगवंताचे चिंतन करत असेल तर, तेवढे भाव निर्माण होत नाहीत. समजा, एखादा भाव जरी प्रगट झाला तरी तो त्याच्या ठिकाणीच राहतो. त्याचे आदान-प्रदान होत नाही.

**कथयन्तश्च माम्**—त्यांना तर एखादा भगवद्भक्त श्रोता मिळाला तर ते भगवंताच्या कथा लीला वर्णन करून सांगतात. ज्याप्रमाणे सनकादी चौघेही भगवंताच्या कथा सांगतात आणि ऐकत असतात. त्यांच्या पैकी कोणी एक वक्ता बनतो, बाकीचे तीन श्रोता बनतात. तसेच भगवंताच्या प्रेमी भक्ताला कोणी जर ऐकणारा भेटला तर ते त्याला भगवंताच्या कथा, गुण, प्रभाव, रहस्य इत्यादी ऐकवतात आणि जर सांगणारा भेटला तर स्वत: ऐकतात. परंतु त्यांचे ठिकाणी ऐकवताना "वक्ता" पणाचा अभिमान नसतो आणि ऐकताना "श्रोता" बनण्याची लाज नसते.

**नित्यं तुष्यन्ति च**—अशा रीतीने भगवंताच्या कथा, लीला, गुण, प्रभाव, रहस्य, इत्यादी बद्दल आपसात चर्चा करत आणि त्यांचेच कथन तसेच चिंतन करत ते भक्त नित्य संतुष्ट राहत असतात. तात्पर्य, त्यांच्या संतुष्टीचे कारण भगवंताशिवाय दुसरे कोणीही नसते, केवळ भगवंतच असतात.

**रमन्ति च**—ते भगवंतातच रमण अर्थात् प्रेम करतात. या प्रेमात त्यांच्यात आणि भगवंतात वेगळेपणा राहत नाही "**तस्मिंस्तज्जने भेदाभावात्**" (नारदभक्तिसूत्र ४१) केव्हा भक्त भगवंताचा भक्त होतो, केव्हा भगवान् आपल्या भक्ताचे भक्त बनतात.† अशाप्रकारे भगवान् आणि भक्तात परस्पर प्रेमाची लीला अनंत काळापर्यंत चालत राहते आणि प्रेम प्रतिक्षण वाढतच जाते.

या वर्णनाने साधकाने या गोष्टीकडे लक्ष दिले पाहिजे की, त्याच्या प्रत्येक क्रिया, भाव, इत्यादीचा प्रवाह केवळ भगवंताकडेच असावा.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवान् सातव्या श्लोकात वर्णित अविचल भक्तियोगाचे वर्णन करीत आहेत. भगवद्भक्तांचे चित्त एका भगवंताला सोडून कुठे जात नाही. त्यांच्या दृष्टीत जर एका भगवंताशिवाय दुसरे काही नाहीच, तर मग त्यांचे चित्त कुठे जाईल, कसे जाईल आणि का जाईल? ते भक्त भगवंतासाठीच जिवंत राहतात आणि त्यांच्या संपूर्ण क्रियाही भगवंतासाठीच होतात. कोणी ऐकणारा जर आला तर ते भगवंताचे गुण, प्रभाव इत्यादीच्या विलक्षण गोष्टींचे ज्ञान करवितात, भगवंताच्या कथा-लीलांचे वर्णन करतात आणि कोणी सांगणारा जर आला तर प्रेमपूर्वक ऐकतात. सांगणाराही तृप्त होत नाही आणि ऐकणाराही तृप्त होत नाही! तृप्त होत नाही हा वियोग आहे आणि नित्य नवा रस मिळतो—तो योग आहे. या वियोग आणि योगामुळे प्रेम

---

* सतामयं सारभृतां निसर्गो यदर्थवाणीश्रुतिचेतसामपि।
प्रतिक्षणं नव्यवदच्युतस्य यत् स्त्रिया विटानामिव साधुवार्ता॥ (श्रीमद्भागवत् १०।१३।२)

सार तत्त्वाला धारण करणाऱ्या पुरुषांचा हा स्वभाव असतो की, त्यांची वाणी, कान आणि अंत:करण भगवंताच्या लीलांना गाणे, ऐकणे आणि चिंतन करण्यासाठीच असतात. जसे लंपट पुरुषांना स्त्रीयांच्या चर्चेत नाविन्य वाटते तसेच भक्तांना भगवंताच्या लीलेत, कथेत नित्य नाविन्य वाटते.

† "एवं स्वभक्तयो राजन् भगवान् भक्तभक्तिमान्"। (श्रीमद्भागवत० १०।८६।५९)

प्रतिक्षण वर्धमान होते. नारदभक्तिसूत्रात आले आहे—

**कण्ठावरोधरोमाञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवीं च॥ ६८॥**

'असे अनन्यभक्त कंठावरोध, रोमाञ्च आणि अश्रुयुक्त नेत्राचे होऊन परस्पर संभाषण करीत आपल्या कुलांना आणि पृथ्वीला पवित्र करतात.'

***संबंध—*** *पूर्व श्लोकात भक्ताद्वारा होणाऱ्या भजनाचा प्रकार सांगून आता भगवान् पुढील दोन श्लोकांत त्यांचेवर विशेष कृपा कशी करतात ते सांगतात.*

## तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्।
## ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते॥ १०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तेषाम्** | = त्या | **प्रीतिपूर्वकम्** | = प्रेमपूर्वक | **ददामि** | = देतो |
| **सततयुक्तानाम्** | = नित्य-निरंतर माझ्यात लागलेल्या (आणि) | **भजताम्** | = (माझे) भजन करणाऱ्या भक्तांना | **येन** | = त्यामुळे |
| | | | | **ते** | = त्यांना |
| | | **तम्** | = (मी) तो | **माम्** | = माझी |
| | | **बुद्धियोगम्** | = बुद्धियोग | **उपयान्ति** | = प्राप्त होते |

***व्याख्या—*** [भगवन्निष्ठ भक्त भगवंताला सोडून समता इच्छित नाहीत अथवा तत्त्वज्ञान इच्छित नाहीत तसेच आणखी कशाचीही इच्छा ठेवत नाहीत. *त्यांचे तर एकच काम असते. नित्य-निरंतर भगवंतात लागून राहणे. भगवंतात व्यस्त राहण्याशिवाय त्यांच्यासाठी इतर कोणते कामच नसते. आता संपूर्ण काम, सर्व जिम्मेदारी भगवंताकडेच आहे अर्थात् त्या भक्तांकडून जे काही करवून घ्यावयाचे आहे, त्यांना जे काही द्यावयाचे आहे इत्यादी सर्व काम भगवंताचेच राहते. म्हणून भगवान् येथे (दोन श्लोकांत) त्या भक्तांना समता आणि तत्त्वज्ञान देण्याचा विषय सांगत आहेत.]

**तेषां सततयुक्तानाम्—**नवव्या श्लोकानुसार जे भगवंतातच चित्त आणि प्राण ठेवणारे भक्त आहेत, भगवंताचे गुण, प्रभाव, लीला, रहस्य, इत्यादीला आपसात एक-मेकाला जाणीव करून देत तसेच भगवंताचे नाम, गुणांचे कथन करत नित्य-निरंतर भगवंतातच संतुष्ट राहत असतात आणि भगवंता-विषयीच प्रेम ठेवतात अशा नित्य-निरंतर भगवंतात व्यस्त असलेल्या भक्तांसाठी येथे "**सततयुक्तानाम्**" पद आले आहे.

**भजतां प्रीतिपूर्वकम्—**त्या भक्तांना ज्ञानाची अथवा वैराग्याची इच्छा नसते. जर ते पारमार्थिक ज्ञान आणि वैराग्यादीची इच्छा ठेवीत नाहीत तर मग सांसारिक भोग तसेच अष्टसिद्धी आणि नवनिधी यांची इच्छा कशी करतील ? त्यांची दृष्टी या वस्तूंकडे जातच नाही. त्यांच्या अंतःकरणात सिद्धी इत्यादीचा काहीही आदर नसतो, काहीही मूल्य नसते. ते तर केवळ भगवंताना आपले समजून प्रेमाने स्वाभाविकच भगवद्भजनात व्यस्त राहतात. त्यांचा कोणत्याही वस्तू, व्यक्ती इत्यादीशी कोणत्याही प्रकारचा कोणताही संबंध राहत नाही. त्यांचे भजन, भक्ती हीच असते की, नित्य-निरंतर भगवंतात लागून राहणे. भगवंताच्या प्रेमामध्ये ते इतके मस्त राहतात की, त्यांच्या मनात, स्वप्नात देखील भगवंताशिवाय इतर कशाचीही इच्छा जागृत होत नाही.

**ददामि बुद्धियोगं तम्—**कोणत्याही वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीच्या संयोग-वियोगाने अंतःकरणात कसलीही चलबिचल होणार नाही अर्थात् संसाराचे पदार्थ मिळोत अथवा न मिळोत, नफा होवो अथवा नुकसान होवो, आदर होवो अथवा निरादर होवो, स्तुती होवो अथवा निंदा होवो, स्वास्थ्य चांगले राहो अथवा न राहो इत्यादी अनेक प्रकारच्या आणि परस्पर एकमेकाच्या विरुद्ध विचित्र परिस्थिती प्राप्त झाल्या तरीही त्यात ते एकरूप (सम) राहू शकतील—असा बुद्धियोग अर्थात् समता मी त्या भक्तांना प्रदान करत असतो.

"**ददामि**" चे तात्पर्य ते बुद्धियोगाला आपले मानत नाहीत, तर भगवंतानेच दिलेला असे मानतात. म्हणून बुद्धि-योगाच्या अनुषंगाने त्यांना आपल्यात कोणतीही विशेषता वाटत नाही.

---

* न पारमेष्ठ्यं न महेन्द्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यम्।
न योगसिद्धीरपुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनान्यत्॥ (श्रीमद्भागवत् ११।१४।१४)

"स्वतःला मला अर्पित होणारा भक्त मला सोडून ब्रह्मदेवाचे पद, इंद्राचे पद, संपूर्ण पृथ्वीचे राज्य, पाताळादी लोकांचे राज्य, योगाच्या संपूर्ण सिद्धी आणि मोक्षही इच्छित नाही."

**येन**—मी त्यांना असा बुद्धियोग प्रदान करतो ज्या बुद्धियोगाने ते मला प्राप्त होतात.

**मामुपयान्ति ते**—जर ते भगवंतातच चित्त आणि प्राण ठेवणारे झाले आणि भगवंतातच संतुष्ट राहतात, तसेच भगवंताविषयीच प्रेम करतात, तर त्यांच्यासाठी आता भगवंताला प्राप्त होण्याचे काय बाकी राहिले, ज्यामुळे भगवंताला हे म्हणावे लागत आहे की, ते मला प्राप्त होतात? मला प्राप्त होण्याचे तात्पर्य, ते प्रेमी भक्त आपल्यात जी उणीव मानत असतात ती त्यांच्या ठिकाणी आता राहत नाही, अर्थात् त्यांना पूर्णतेचा अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—जोपर्यंत राग-द्वेष (विषमता) आहे तोपर्यंत संसारच दिसतो, भगवान् दिसत नाहीत. भगवान् द्वन्द्वातीत आहेत. जोपर्यंत राग-द्वेषरूप द्वन्द्व राहते, तोपर्यंत दोन वस्तू दिसतात, एक वस्तू दिसत नाही. जेव्हा राग-द्वेष समाप्त होतात तेव्हा एका भगवंताशिवाय काहीही दिसत नाही! तात्पर्य, राग-द्वेष समाप्त झाल्यावर अर्थात् समता प्राप्त झाल्यावर 'सर्व काही भगवान्च आहेत'—असा अनुभव होतो. म्हणून भगवान् आपल्या भक्तांना समता प्रदान करतात. समता हाच '**बुद्धियोग**' अर्थात् कर्मयोग आहे—'**समत्वं योग उच्यते**' (गीता २।४८). गीतेत कर्मयोगाला '**बुद्धियोग**' नावाने म्हटले गेले आहे. जसे—'**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय**' (२।४९), '**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव**' (१८।५७). बुद्धियोग प्राप्त झाल्यावर भक्त दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होऊन त्याला सुख पोहचविण्याचा प्रयत्न करतो.

एक चिंतन 'करत' असतो आणि एक चिंतन 'होत' असते. ते चिंतन, भजन केले जाते ते नकली (कृत्रिम) असते आणि जे आपोआप होते ते असली असते. केले जाणारे चिंतन निरंतर होत नाही परंतु आपोआप होणारे चिंतन श्वासासारखे निरंतर होत असते. त्यात अंतर पडत नाही—'**सततयुक्तानाम्**'. शरीराविषयी प्रीयता, आसक्ती असल्याने भगवंताचे चिंतन करावे लागते आणि शरीराचे चिंतन आपोआप होते. परंतु भगवंतात प्रीयता (आत्मीयता) झाल्यास भजन करावे लागत नाही तर आपोआप होते आणि सुटतही नाही. म्हणून येथे प्रेमपूर्वक भजन करण्याचा विषय आला आहे—'**भजतां प्रीतिपूर्वकम्**'.

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता॥ ११॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तेषाम्** | = त्या भक्तांवर | | (अस्तित्वात) | **तमः** | = अंधकार |
| **अनुकम्पार्थम्,** | = कृपा | | राहणारा | **भास्वता** | = दैदीप्यमान |
| **एव** | करण्यासाठीच | **अहम्** | = मी (त्यांचा) | **ज्ञानदीपेन** | = ज्ञानरूप दीपकाद्वारा |
| **आत्मभावस्थः** | = त्यांच्या स्वरूपात | **अज्ञानजम्** | = अज्ञानजन्य | **नाशयामि** | = नष्ट करतो. |

*व्याख्या*—**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः**—त्या भक्तांच्या अंतःकरणात कशाचीही सांसारिक इच्छा नसते. इतकेच नव्हे तर त्यांच्या अंतःकरणात मला सोडून मुक्तीची-ही इच्छा नसते.*अभिप्राय असा की, त्यांना सांसारिक वस्तूंची इच्छा नसते आणि पारमार्थिक (मुक्ती, तत्त्वबोध इत्यादी) गोष्टींचीही इच्छा नसते. ते तर केवळ प्रेमाने माझे भजन करत असतात. त्यांच्या ह्या निष्कामभाव आणि प्रेमपूर्वक भजन करण्याकडे पाहून माझे हृदय द्रवित होते. मी अशी इच्छा करतो की, माझ्याकडून त्यांची काही तरी सेवा व्हावी; माझ्याकडून त्यांनी काही तरी घ्यावे. परंतु ते माझ्याकडून काही घेत नाहीत, तेव्हा अंतःकरण दयेने द्रवित झाल्यामुळे त्यांच्यावर कृपा करण्यासाठी कृपा-परवश होऊन, मी त्यांच्या अज्ञानजन्य अंधकाराला दूर करून टाकतो. माझे हृदय द्रवित होण्याचे कारण हे आहे की, माझ्या भक्तांच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारची किंचितमात्रही उणीव राहू नये.

**आत्मभावस्थः**—मनुष्य आपले जे अस्तित्व मानतो की, "मी आहे" तर हे अस्तित्व प्रायः, प्रकृतीशी (शरीर) संबंध जोडूनच मानले जाते. अर्थात् तादात्म्यामुळे शरीराच्या बदलण्याला आपले बदलणे मानले जाते. जसे मी बालक आहे, मी तरुण आहे, मी बलवान आहे, मी निर्बल आहे इत्यादी. परंतु या विशेषणाला सोडून तत्त्वाच्या दृष्टीने या

* (१) सालोक्यसार्ष्टिसामीप्यसारूप्यैकत्वमप्युत।
दीयमानं न गृह्णन्ति विना मत्सेवनं जनाः॥ (श्रीमद्भागवत् ३।२९।१३)
"माझे प्रेमी भक्तगण माझी सेवा सोडून सालोक्य, सार्ष्टी, सामीप्य, सारुप्य आणि सायुज्य (या पाच प्रकारच्या) मुक्तींना दिले तरी घेत नाहीत."
(२) अस बिचारि हरि भगत सयाने। मुक्ति निरादर भगति लुभाने॥ (मानस ७।११९।४)

प्राण्यांचे जे अस्तित्व आहे ते प्रकृतीहून रहित आहे. याच अस्तित्वात सर्वकाळ राहणाऱ्या भगवंतासाठी येथे "**आत्मभावस्थः**" पद आले आहे.

**भास्वता ज्ञानदीपेन नाशयामि**—प्रकाशमान् ज्ञान-दीपकद्वारा मी त्या प्राण्यांच्या अज्ञानजन्य अंधकाराचा नाश करतो. तात्पर्य, ज्या अज्ञानामुळे "मी कोण आहे माझे स्वरूप काय आहे?" असा जो अज्ञानीपणा राहतो, त्या अज्ञानाचा मी नाश करतो, अर्थात् तत्त्वबोध करवितो. ज्या तत्त्वबोधाचे माहात्म्य शास्त्रांत वर्णन केले गेले आहे, त्याच्यासाठी त्यांना श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादी साधने करावी लागत नाहीत, काहीही श्रम करावे लागत नाहीत, तर मी स्वतः त्यांना तत्त्वबोध करून देतो.

**विशेष गोष्ट**

भक्त जेव्हा अनन्यभावाने भगवद्भक्ती करतो तेव्हा सांसारिक सिद्धी असिद्धीत सम राहणे—ही "समता" देखील भगवान् प्रदान करतात आणि ज्याच्यासारखे दुसरे पवित्र काही नाही, तो "तत्त्वबोध" (स्वरूपज्ञान) ही भगवान् स्वतः देतात. भगवंताचे स्वतः देण्याचे तात्पर्य, भक्तांना यांची इच्छा आणि प्रयत्न करावा लागत नाही, तर भगवत्कृपेने त्यांच्यात समता आपोआप येत असते. त्यांना तत्त्वबोध आपोआप होत असतो. कारण जेथे भक्तिरूपी आई असेल, त्या ठिकाणी तिची ज्ञान आणि वैराग्यरूपी मुले राहणारच! म्हणून भक्ती प्राप्त झाली असता संसारापासून वैराग्य आणि आपल्या स्वरूपाचा बोध ही दोन्हीही आपोआप होतात. याचे तात्पर्य, जी साधनजन्य पूर्णता होत असते, त्यापेक्षा भगवंताकडून झालेली पूर्णता काही और असते. यात अपूर्णतेचा गंधही नसतो.

ज्याप्रमाणे भगवान् अनन्यभावाने भजन करणाऱ्या भक्तांचे योगक्षेम वहन करतात (९।२२), त्याचप्रमाणे जो केवळ भगवत्परायण असतो, अशा प्रेमी भक्तांना (ते इच्छा करत नसतानाही आणि त्यांच्यासाठी काहीही बाकी राहिले नसूनही) भगवान् समता आणि तत्त्वबोध करून देतात. हे सर्व देऊनही भगवान् त्यांचे कायमचे ऋणी राहतात. भगवंतांनी भागवतात गोपींसाठी म्हटले आहे की "माझ्याशी संपूर्णपणे निर्दोष (अनिंद्य) संबंध जोडणाऱ्या गोपींचे माझ्यावर एवढे उपकार आहेत, एवढे ऋण आहे की, त्यांना मी देवतांसारखे दीर्घ आयुष्य प्रदान करूनही ते फेडू शकणार नाही. कारण मोठमोठे ऋषी-मुनी, त्यागी इत्यादीही घराच्या ज्या ममत्वाच्या बेड्या सुगमतेने तोडू शकत नाहीत, त्या त्यांनी सहज तोडून टाकल्या आहेत.*

भक्त भगवंताच्या भजनात इतके तल्लीन असतात की, त्यांना याचा पत्ताही लागत नाही की, आपल्या ठिकाणी समता आली आहे, आपल्याला स्वरूपाचा बोध झाला आहे. जर त्यांच्या लक्षात आले तर त्यांना आश्चर्य वाटते की, ही समता, हा तत्त्वबोध आला तरी कोठून? ते "आपल्यात कोणतीच विशेषता दिसू नये" म्हणून भगवंताला प्रार्थना करतात की, "हे नाथ! आपण ही समता, तत्त्वबोधच काय पण संपूर्ण जगाच्या उद्धाराचा जरी मला अधिकार दिलात तरीही मला त्याची जाणीव होऊ नये की, माझ्यात ही विशेषता आहे. मी केवळ आपल्या भजन-चिंतनातच सदैव मग्न रहावे"

**परिशिष्ट भाव**—जरी कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्ही साधने आहेत आणि भक्तियोग साध्य आहे, तरीही भगवान् आपल्या भक्तांना कर्मयोगही प्रदान करतात—'**ददामि बुद्धियोगं तम्**' आणि ज्ञानयोगही प्रदान करतात—'**ज्ञानदीपेन भास्वता**' अपरा आणि परा—दोन्ही प्रकृती भगवंताच्याच आहेत. म्हणून भगवान् कृपा करून आपल्या भक्ताला अपराच्या प्रधानतेने होणारा कर्मयोग आणि पराच्या प्रधानतेने होणारा ज्ञानयोग—दोन्ही प्रदान करतात. म्हणून भक्ताला कर्मयोगाने प्राप्त होणारे तत्त्व 'निष्कामभाव' आणि ज्ञानयोगाने प्राप्त होणारे तत्त्व 'स्वरूपबोध'—दोन्हीही सुगमतेने प्राप्त होतात. कर्मयोग प्राप्त झाल्यावर भक्ताद्वारा संसारावर उपकार होतो आणि ज्ञानयोग प्राप्त झाल्यावर भक्ताचा देहाभिमान नाहीसा होतो.

भक्त भगवंताच्या चिंतनात, प्रेमातच संतुष्ट आणि मग्न राहतो. त्याला आपल्यातही कोणती उणीव दिसत नाही आणि काही मिळविण्याचीही आवश्यकता भासत नाही. जसा बालक संपूर्णपणे मातेच्याच आश्रित राहतो तेव्हा त्याची दृष्टी आपल्या उणीवे-कडे जातच नाही! माताच त्याच्याकडे लक्ष ठेवते, त्याला स्नान घालते, मलिन वस्त्र उतरवून स्वच्छ वस्त्र परिधान करविते. तसेच भक्त संपूर्णपणे भगवंताच्याच आश्रित होतो की, 'मी कसाही असलो तरी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत'. तो स्वतःकडे लक्षच देत नाही. म्हणून भगवान् स्वतःच त्याच्या अंतःकरणात स्थित असलेले अज्ञान तत्त्वज्ञानाद्वारा नष्ट करतात. बालकात तर मूढता विशेष राहते परंतु भक्तात विवेक विशेष राहतो.

भक्ताचे मुख्य कर्तव्य आहे—भगवंताला आपले मानणे. भक्त आपल्या कर्तव्याचे पालन करतो तर भगवान्सुद्धा आपल्या

* न पारयेऽहं निरवद्यसंयुजां स्वसाधुकृत्यं विबुधायुषापि वः। या माभजन् दुर्जरगेहशृङ्खलाः संवृश्च्य तद् वः प्रतियातु साधुना॥
(श्रीमद्भा० १०।३२।२२)

कर्तव्याचे पालन करतात आणि त्याने न मागता, न इच्छिता आपल्याकडून त्याला कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्हींचे सामर्थ्य प्रदान करतात, ज्यामुळे त्याच्यात कोणत्याही प्रकारची उणीव राहू नये.

कर्मयोगात शांतरस, ज्ञानयोगात अखंडरस आणि भक्तियोगात अनंतरस आहे. शांतरस आणि अखंडरस यात अनंतरस नाही परंतु अनंतरसात शांतरसही आहे आणि अखंडरसही आहे.

कर्मयोग आणि ज्ञानयोग लौकिक साधने आहेत आणि भक्तियोग अलौकिक साधन आहे. अलौकिकाची प्राप्ती झाल्यावर लौकिकाची प्राप्ती भगवत्कृपेने आपोआप होते. परंतु लौकिकाची प्राप्ती झाल्यावर अलौकिकाची प्राप्ती होत नाही. कारण अलौकिकात तर लौकिक येते परंतु लौकिकात अलौकिक येत नाही.

ज्ञानी तर भक्तिरहित असू शकतो परंतु भक्त ज्ञानरहित असू शकत नाही. *गोपींनी श्रुतींचे अध्ययनही केले नव्हते, ज्ञानी महापुरुषांचा संगही केला नव्हता आणि व्रत, तप इत्यादीही केले नव्हते,† तरीही त्यांच्यात विलक्षण ज्ञान होते. ‡तात्पर्य, भक्ताला स्वरूपाचाही बोध होतो. **'वासुदेवः सर्वम्'** याचा तर त्याला बोध असतो!

**'आत्मभावस्थः'**—जीवामध्ये भगवान् राहतात कारण तो भगवंताचाच अंश आहे. वास्तविक भगवान्‌च जीवरूपाने प्रकट झाले आहेत. कारण भगवंताची परा-प्रकृती असल्यामुळे जीव भगवंताशी अभिन्न आहे. उपनिषदात आले आहे की, शरीरांची रचना करून भगवान् स्वतःच त्यात प्रविष्ट झाले—**'तत्सृष्ट्वातदेवानुप्राविशत्'** (तैत्तिरीय० २। ६).

***संबंध***—*भक्तावरील भगवंताची ही अलौकिक आणि विलक्षण कृपेची गोष्ट ऐकून अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या कृपेकडे जाते आणि त्या कृपेने प्रभावित होऊन ते पुढील चार श्लोकांत भगवंताची स्तुती करतात.*

*अर्जुन उवाच*

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम्॥ १२॥**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे॥ १३॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परम्** | = परम | **पुरुषम्** | = पुरुष, | **असितः** | = असित, |
| **ब्रह्म** | = ब्रह्म, | **आदिदेवम्** | = आदिदेव, | **देवलः** | = देवल |
| **परम्** | = परम | **अजम्** | = अजन्मा (आणि) | **तथा** | = आणि |
| **धाम** | = धाम (आणि) | **विभुम्** | = सर्वव्यापक आहात— | **व्यासः** | = व्यास |
| **परमम्** | = महान | **त्वाम्** | = (असे) आपणाला | **आहुः** | = म्हणतात |
| **पवित्रम्** | = पवित्र | **सर्वे** | = सर्वचे सर्व | **च** | = आणि |
| **भवान्** | = आपणच आहात | **ऋषयः** | = ऋषि, | **स्वयम् एव** | = स्वतः आपणही |
| **शाश्वतम्** | = (आपण) शाश्वत | **देवर्षिः** | = देवर्षि, | **मे** | = मला |
| **दिव्यम्** | = दिव्य | **नारदः** | = नारद, | **ब्रवीषि** | = सांगत आहात. |

* मम दरसन फल परम अनूपा। जीव पाव निज सहज सरूपा॥ (मानस अरण्य० ३६। ५)

† ते नाधीतश्रुतिगणा नोपासित महत्तमाः।
अव्रतातप्ततपसः सत्सङ्गान्मामुपागताः॥ (श्रीमद्भा० ११। १२। ७)

'त्यांनी तर वेदांचे अध्ययन केले नव्हते आणि विधिपूर्वक महापुरुषांची उपासनाही केली नव्हती. अशाप्रकारे त्यांनी कृच्छ्रचान्द्रायण इत्यादी व्रते अथवा कोणती तपश्चर्याही केली नव्हती. बस, केवळ सत्संगाच्या (प्रेमाच्या) प्रभावानेच त्या मला प्राप्त झाल्या'.

‡ न खलु गोपिकानन्दनो भवानखिलदेहिनामन्तरात्मदृक्।
विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले ॥ (श्रीमद्भा० १०। ३१। ४)

(गोपीका म्हणतात—) 'हे सखे! आपण निश्चितच केवळ यशोदेचे पुत्रच नाहीत, तर संपूर्ण प्राण्यांच्या अंतरात्म्याचे साक्षी आहात. ब्रह्मदेवांची प्रार्थना ऐकून विश्वाचे रक्षण करण्यासाठीच आपण यदुकुलात अवतीर्ण झाले आहात.'

*व्याख्या*— **परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्**— आपल्यासमोर बसलेल्या भगवंताची स्तुती करत अर्जुन म्हणतात की, "मी विचारल्यावरून ज्याला आपण परम-ब्रह्म (८।३) म्हटले आहे, ते परमब्रह्म आपणच आहात. ज्यात सर्व संसार स्थित असतो ते परमधाम अर्थात् परम-स्थान आपणच आहात (९।१८) ज्याला पवित्राती पवित्र म्हटले आहे. "**पवित्राणां पवित्रं यः**" ते महान् पवित्रही आपणच आहात.

**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं.........स्वयं चैव ब्रवीषि मे**—ग्रंथांत ऋषींनी*, देवर्षी नारदांनी†, असित आणि त्यांचे पुत्र देवल ऋषींनी ‡तसेच महर्षी व्यासांनी卐 आपणाला "शाश्वत", (२।२०), सगुण निराकाराच्या रूपात "दिव्य पुरुष" (८।१०), देवता आणि महर्षी इत्यादीच्या रूपात "आदिदेव" (१०।२), मूढलोक मला अज म्हणून जाणत नाहीत (७।२५), तसेच असम्मूढ लोक मला अज म्हणून जाणतात (१०।३) या रूपात "अज" आणि मी संपूर्ण संसारात अव्यक्तरूपाने व्यापक आहे (९।४) या रूपात "विभु" स्वतः आपण मला सांगितले आहे.

**परिशिष्ट भाव**—निर्गुण-निराकारासाठी '**परं ब्रह्म**', सगुण-निराकारासाठी '**परं धाम**' आणि सगुण-साकारासाठी '**पवित्रं परमं भवान्**' पदांचा प्रयोग करून अर्जुन भगवंताना जणू हे म्हणत आहेत की, समग्र परमात्मा आपणच आहात (गीता ७। २९-३०, ८। १-४).

जो स्वतःही शुद्ध आहे आणि दुसऱ्यांनाही शुद्ध करतो तो 'परम पवित्र' आहे. भगवान् परम पवित्र आहेत आणि त्यांचे नाम, रूप इत्यादी सर्वही परम पवित्र आहे. चौथ्या अध्यायाच्या अडतीसाव्या श्लोकात ज्ञानाला या लोकात सर्वापेक्षा पवित्र सांगितले गेले आहे—'**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते**'. परंतु ते ज्ञानही समग्र भगवंताच्या अंतर्गत आहे. म्हणून भगवान् ज्ञानापेक्षाही अधिक पवित्र आहेत.

## सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव।
## न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः॥ १४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **केशव** | = हे केशव! | **ऋतम्** | = सत्य | **हि** | = तर |
| **माम्** | = मला (आपण) | **मन्ये** | = मानतो. | **देवाः** | = देवताही |
| **यत्** | = जे काही | **भगवन्** | = हे भगवन्! | **विदुः** | = जाणत |
| **वदसि** | = सांगत आहात, | **ते** | = आपल्या | **न** | = नाहीत (आणि) |
| **एतत्** | = हे | **व्यक्तिम्** | = प्रकट होण्याला | **दानवाः** | = दानवही |
| **सर्वम्** | = सर्व (मी) | | | **न** | = जाणत नाहीत. |

*व्याख्या*— **सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव**— "क" ब्रह्मदेवाला म्हणतात, "अ" विष्णूला म्हणतात, "ईश" शंकराला म्हणतात. आणि "व" म्हणजे वपु अर्थात् स्वरूपाला म्हणतात. अशाप्रकारे ब्रह्मा, विष्णू, महेश ज्यांचे स्वरूप आहे त्याला "**केशव**" म्हणतात. अर्जुनाचे या ठिकाणी भगवंताला "**केशव**" संबोधन देण्याचे तात्पर्य असे आहे की, आपणच संसाराची उत्पत्ती, स्थिती आणि संहार करणारे आहात.

सातव्यापासून नवव्या अध्यायापर्यंत माझ्याशी आपण "**यत्**" जे काही सांगत आलात, ते सर्व मी सत्य मानतो आणि

* मार्कंडेय ऋषींनी म्हटले आहे, "श्रीकृष्ण यज्ञांचे यज्ञ, तपाचे तप, भूत-भविष्यत्-वर्तमानरूप आहेत." (महाभारत भीष्म ६८।३)
भृगुऋषींनी म्हटले आहे, "हे देवतांचे देवता आणि परम पुरातन विष्णू आहेत" (महाभारत भीष्म ६८।४)
अंगिराऋषीनी म्हटले आहे, "हे संपूर्ण प्राण्यांची रचना करणारे आहेत" (महाभारत भीष्म ६८।६)
सनत्कुमार इत्यादींनी म्हटले आहे, "यांच्या मस्तकाने आकाश आणि बाहूने पृथ्वी व्यापली आहे. तिन्ही लोक यांच्या उदरात स्थित आहेत. हे सनातन पुरुष आहेत. तपाने अंतःकरण शुद्ध झाल्यावरच साधक यांना जाणून घेऊ शकतात. आत्मसाक्षात्काराने तृप्त झालेल्या ऋषीमध्येही हे परमोत्कृष्ट आहेत. युद्धात कधी पाठ न दाखवणारे उदार राजर्षी यांचीही हे परमगती आहेत." (महाभारत भीष्म ६८।८-१०)

† देवर्षी नारदजींनी म्हटले आहे,"भगवान् श्रीकृष्ण संपूर्ण लोकांना उत्पन्न करणारे आणि संपूर्ण भावांना जाणणारे आहेत. हे साध्यांच्या आणि देवतांच्या ईश्वरांचेही ईश्वर आहेत (महा० भीष्म० ६८।२)

‡ असित आणि देवल ऋषींनी म्हटले आहे, "भगवान् श्रीकृष्णच प्रजेच्या सृष्टीत प्रजापती आणि संपूर्ण लोकांचे एकमात्र रचयिता आहेत". (महाभारत वन १२।५०)

卐 महर्षी व्यासांनी म्हटले आहे, "आपण वसुंचे वासुदेव, इंद्राला इंद्रत्व देणारे आणि देवतांचेही परम देवता आहात." (महा० भीष्म ६८।५)

"एतत्", आत्ताच दहाव्या अध्यायात आपण ज्या विभूती आणि योगाचे वर्णन केले आहे, ते सर्वही मी सत्य मानतो. तात्पर्य, आपणच सर्वांचे उत्पादक आणि संचालक आहात. आपल्यापासून वेगळा कोणीही होऊ शकत नाही. आपणच सर्व श्रेष्ठ आहात. अशाप्रकारे सर्वांच्या मूळात आपणच आहात. यात मला मुळीच संशय नाही.

भक्तिमार्गात विश्वासाची मुख्यता असते. भगवंतांनी पहिल्या श्लोकात अर्जुनाला परम वचन ऐकण्याची आज्ञा केली. त्याच परम वचनाला अर्जुन येथे "ऋतम्" अर्थात् सत्य म्हणून त्याविषयी विश्वास प्रगट करतात.

**न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः**—आपण (४।५ मध्ये) म्हटले आहे की, माझे आणि तुझे पुष्कळ जन्म झाले आहेत. त्या सर्वांना मी जाणतो, तू जाणत नाहीस. त्याचप्रमाणे आपण (१०।२ मध्ये) म्हटले आहे की, माझ्या प्रगट होण्याला देवता आणि महर्षीही जाणत नाहीत. आपल्या प्रगट होण्याच्या विषयात आपण जे काही म्हटले आहे, ते सर्व योग्यच आहे. कारण मनुष्यापेक्षा देवतांचे ठिकाणी जी दिव्यता असते ती दिव्यता भगवत्तत्त्व जाणून घेण्यात काहीही उपयोगात येत नाही. ती दिव्यता प्राकृत—उत्पन्न आणि नष्ट होणारी असते, म्हणून ते आपल्या प्रगट होण्याच्या तत्त्वाला, हेतूला पूर्णपणे जाणू शकत नाहीत. जर देवताच जाणून घेऊ शकत नाहीत, तर मग राक्षस कसे जाणून घेऊ शकतील? तरीपण येथे "दानवाः" पद देण्याचे तात्पर्य, राक्षस हे फार विलक्षण मायावी असतात. त्यामुळे ते विचित्र प्रभाव दाखवू शकतात. परंतु त्या माया-शक्तीने ते भगवंताला जाणून घेऊ शकत नाहीत. भगवंतासमोर राक्षसांची माया कुंठित होत असते. कारण प्रकृती आणि प्रकृतीच्या जितक्या काही शक्ती आहेत त्या सर्वांपेक्षा भगवान् पलीकडे आहेत. भगवान् अनंत आहेत, असीम आहेत आणि दानवांची माया-शक्ती कितीही विलक्षण असली तरी प्राकृत, सीमित, उत्पत्ति-विनाशशील असते. सीमित आणि नाशवान् वस्तूद्वारा अविनाशी आणि असीम तत्त्वाला कसे जाणून घेता येणे शक्य आहे?

तात्पर्य मानव, देव, राक्षस, इत्यादी कोणीही आपल्या शक्तीने, सामर्थ्याने, योग्यतेने, बुद्धीने, भगवंताला जाणून घेऊ शकत नाही. कारण मानवादीत जाणून घेण्याची जितकी योग्यता, सामर्थ्य, विशेषता आहे ती सर्व प्राकृत असते आणि भगवान् प्रकृतीच्या पलीकडचे आहेत. त्याग, वैराग्य, तप, स्वाध्याय, इत्यादी अंतःकरणाला निर्मळ बनविणारे आहेत, परंतु यांच्या बळावरही भगवंताला जाणून घेता येणे शक्य नाही. भगवंताला तर, अनन्यभावाने शरण होऊन त्यांच्या कृपेनेच जाणून घेता येणे शक्य आहे. (१०।११; ११।५४)

**परिशिष्ट भाव**—भगवंताला स्वतःच्या शक्तीने कोणीही जाणू शकत नाही, तर भगवत्कृपेनेच जाणू शकतो—

**सोइ जानइ जेहि देहु जनाई। जानत तुम्हहि तुम्हइ होइ जाई॥**
**तुम्हरिहि कृपाँ तुम्हहि रघुनंदन। जानहिं भगत भगत उर चंदन॥**

(मानस २।१२७।२)

भगवंतापाशी बुद्धीचे चमत्कार, सिद्धी चालू शकत नाहीत. मोठ-मोठ्या भौतिक अविष्काराद्वारा कोणीही भगवंताला जाणू शकत नाही.

## स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम।
## भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते॥ १५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भूतभावन** | = हे भूतभावन! | **पुरुषोत्तम** | = हे पुरुषोत्तम! | | आपल्याद्वारा |
| **भूतेश** | = हे भूतेश! | **त्वम्** | = आपण | **आत्मानम्** | = आपण-आपल्याला |
| **देवदेव** | = हे देवदेव! | **स्वयम्, एव** | = स्वतःच | | |
| **जगत्पते** | = हे जगत्पते! | **आत्मना** | = आपण- | **वेत्थ** | = जाणता. |

***व्याख्या*—भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते, पुरुषोत्तम**—संपूर्ण प्राण्यांना संकल्पमात्राने उत्पन्न करणारे असल्याने आपण "भूतभावन" आहात. संपूर्ण प्राण्यांचे आणि देवतांचे मालक असल्याने आपण "भूतेश" आणि "देवदेव" आहात. जड-चेतन, स्थावर जंगम, संपूर्ण जगताचे पालन-पोषण करणारे असल्याने आपण "जगत्पती" आहात आणि संपूर्ण पुरुषांहून उत्तम असल्याने आपण ह्या इह लोकात आणि वेदात "पुरुषोत्तम" नावाने म्हटले गेले आहात* (१५।१८)

* काव्यात देखील भगवंताला "पुरुषोत्तम" नावाने म्हटले गेले आहे "हरिर्यथैकः पुरुषोत्तमः स्मृतः" (रघुवंश ३।४९)

या श्लोकात पाच संबोधने आलेली आहेत. इतकी संबोधने संपूर्ण गीतेत कोणत्याच श्लोकात आलेली नाहीत. कारण भगवंताच्या विभूती आणि कृपा करण्याची गोष्ट ऐकून, अर्जुनाच्या मनात भगवंताविषयी विशेष प्रेम उचंबळून आले आणि त्या प्रेमात विभोर होऊन त्यांनी एकदम पाच नावाने संबोधन देऊन स्तुती केली* आहे.

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वम्**—भगवान् स्वतःला स्वतःच जाणतात. स्वतःला जाणण्यासाठी त्यांना कोणत्या प्राकृत साधनाची आवश्यकता नसते. स्वतःला जाणण्यात त्यांची स्वतःची कोणती वृत्ती उत्पन्न होत नाही, एखादी जिज्ञासाही राहत नाही, एखाद्या करणाची (अंतःकरण आणि बहिःकरण) आवश्यकता नसते. त्यांचे ठिकाणी शरीर-शरीरीचा भावही नसतो. ते तर स्वतः स्वाभाविकच स्वतः-ला स्वतःनेच जाणतात. त्यांचे हे ज्ञान करणनिरपेक्ष असते, करणसापेक्ष नसते.

या श्लोकाचा भाव असा आहे की, जसे भगवान् स्वतःच स्वतःला जाणतात तसेच त्यांचा अंश असलेल्या जीवानेही स्वतःच स्वतःला जाणून घेतले पाहिजे. अर्थात् आपल्या स्वरूपाला जाणून घेतले पाहिजे. आपलेच आपल्याला जे स्वरूपाचे ज्ञान होत असते, ते संपूर्णपणे करणनिरपेक्ष असते. म्हणून इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीने आपल्या स्वरूपाला जाणू शकत नाही. भगवंताचा अंश असल्याने भगवंताप्रमाणे जीवाचे स्वतःचे ज्ञानही करण-निरपेक्ष असते.

**परिशिष्ट भाव**—आपण स्वतःच आपण-आपल्याद्वारा आपण-आपल्याला जाणता— याचे तात्पर्य असे आहे की, जाणणारेही आपणच आहात, जाणण्यात येणारेही आपणच आहात आणि जाणणेही आपणच आहात अर्थात् सर्व काही आपणच आहात. जर आपल्याशिवाय दुसरे काही नाहीच तर मग कोण कोणाला जाणेल?

तत्त्वाला जाणण्याचा प्रयत्न कराल तर तत्त्वापासून दूर व्हाल, कारण तत्त्वाला ज्ञेय (जाणण्याचा विषय) बनवाल तेव्हाच तर त्याला जाणण्याची इच्छा कराल. तत्त्व तर सर्वांचा ज्ञाता आहे, ज्ञेय नाही. सर्वांच्या ज्ञात्याचा दुसरा कोणी ज्ञाता होऊ शकत नाही. †जसे डोळ्याने सर्वांना पाहतो परंतु डोळ्याने डोळ्याला पाहू शकत नाही. कारण डोळ्याची पाहण्याची शक्ती इंद्रियांचा विषय नाही. अर्थात् इंद्रिये स्वतः अतींद्रिय आहेत.‡ म्हणून ते परमात्मतत्त्व स्वतःच स्वतःचा ज्ञाता आहे.

*संबंध—विभूतींचे ज्ञान भगवंतात दृढ भक्ती करविणारे असते (१०।७) म्हणून आता पुढील तीन श्लोकात अर्जुन भगवंताला विस्ताराने विभूती सांगण्यासाठी प्रार्थना करत आहेत.*

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि॥ १६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = म्हणून | **लोकान्** | = संपूर्ण लोकांना | **अशेषेण** | = संपूर्णपणे |
| **याभिः** | = ज्या | **व्याप्य** | = व्याप्त करून | **वक्तुम्** | = वर्णन करण्यात |
| **विभूतिभिः** | = विभूतींनी | **तिष्ठसि** | = स्थित आहात, (त्या सर्व) | | |
| **त्वम्** | = आपण | **दिव्याः,** | = आपल्या दिव्य | **अर्हसि** | = आपणच समर्थ आहात. |
| **इमान्** | = ह्या | **आत्मविभूतयः** | विभूतींना | | |

*व्याख्या*— **याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि**—भगवंतांनी पूर्वी (सातव्या श्लोकात) ही गोष्ट सांगितली होती की, जो मनुष्य माझ्या विभूतींना आणि योगाला तत्त्वाने जाणतो त्याचा माझे ठिकाणी अटळ भक्ति-योग होतो. ते ऐकल्यावर अर्जुनाचे मनात आले की, भगवंताचे ठिकाणी दृढ भक्ती होण्याचा हा फारच सोपा

* येथे भूतभावन, भूतेश, देवदेव, जगत्पते आणि पुरुषोत्तम या पाच सबोधनांना क्रमशः सूर्य, शिव, गणेश, शक्ती, आणि विष्णू—या ईश्वर कोटीच्या पाच देवतांचे वाचक मानू शकतो. या संबोधनांचा प्रयोग करून अर्जुन भगवंताला जणू हे म्हणतात की, ह्या पाचही देवता मूळात आपणच आहात.

† 'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा' (बृहदारण्यक० ३।७।२३)
'याहून भिन्न कोणी द्रष्टा नाही'.
'विज्ञातारमरे केन विजानीयात्' (बृहदारण्यक० २।४।१४)
'सर्वांच्या विज्ञात्याला कोणाकडून जाणले जावे?'

‡ इंद्रियांना पाहणारे इंद्रिये नाहीत, मन आहे. मनाला पाहणारे मन नाही, बुद्धी आहे. बुद्धीला पाहणारी बुद्धी नाही, अहम् आहे. अहम्ला पाहणारा अहम् नाही, स्वयं आहे. स्वयंला पाहणारा स्वयंच आहे.

आणि श्रेष्ठ उपाय आहे. कारण भगवंताच्या विभूतींना आणि योगाला तत्त्वाने जाणल्यावर मनुष्याचे मन स्वाभाविकच भगवंताकडे ओढले जाते आणि भगवंताचे ठिकाणी त्याची स्वाभाविकच भक्ती जागृत होते. अर्जुन आपले कल्याण इच्छित होते आणि कल्याणासाठी त्यांना भक्ती हाच सर्व श्रेष्ठ उपाय दिसत होता. म्हणून अर्जुन म्हणतात की, ज्या विभूतींनी आपण संपूर्ण लोकांना व्यापून स्थित आहात, त्या अलौकिक, विलक्षण विभूतींचे विस्तारपूर्वक संपूर्णपणे वर्णन करावे. कारण ते सांगण्यात आपणच समर्थ आहात. आपल्याशिवाय त्या विभूतींना इतर कोणी सांगू शकत नाही.

**वक्तुमर्हस्यशेषेण**—आपण पूर्वी (सातव्या, नवव्या आणि या दहाव्या अध्यायाच्या आरंभी) आपल्या विभूती सांगितल्या आणि त्यांना जाणण्याचे फल दृढ भक्तियोग होणे हे सांगितले. म्हणून मीही आपल्या सर्व विभूतींना जाणून घेईल आणि त्याप्रमाणे माझीही आपल्या ठिकाणी दृढ भक्ती होऊन जाईल. म्हणून आपल्या विभूतींना आपण पूर्णपणे सांगावे. सांगणे शिल्लक काहीही ठेवू नये.

**दिव्या ह्यात्मविभूतयः**—विभूतींना दिव्य म्हणण्याचे तात्पर्य, संसारात जी काही विशेषता दिसत असते, ती मूळात परमात्म्याचीच आहे, संसाराची नव्हे. म्हणून संसाराची विलक्षणता पाहणे भोग आहे आणि परमात्म्याची विशेषता पाहणे विभूती आहे, योग आहे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुन भगवंताला म्हणतात की, तुमच्या संपूर्ण विभूतींचे तुम्हीच वर्णन करू शकता. कारण तुम्ही स्वतःच तुम्हाला जाणता (गीता १०। १५). दुसरा तुम्हाला जाणेल—हे शक्यच नाही (गीता १०। २, १४). म्हणून तुम्ही स्वतःच तुमच्या संपूर्ण विभूतींना सांगा ज्यामुळे मला अविचल भक्तियोगाची प्राप्ती होईल.

## कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन्।
## केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया॥ १७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **योगिन्** | = हे योगिन्! | **कथम्** | = कसे | **मया** | = माझ्याद्वारा |
| **सदा** | = निरंतर | **विद्याम्** | = जाणू? | **चिन्त्यः, असि** | = चिंतन केले जाऊ शकता अर्थात् कोण-कोणत्या भावांनी मी आपले चिंतन करू? |
| **परिचिंतयन्** | = सांगोपांग चिंतन करीत | **च** | = आणि | | |
| | | **भगवन्** | = हे भगवन्! | | |
| **अहम्** | = मी | **केषु, केषु** | = कोण-कोणत्या | | |
| **त्वाम्** | = आपणाला | **भावेषु** | = भावांनी (आपण) | | |

*व्याख्या*— **कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन्**—सातव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, जो माझ्या विभूतींना आणि योगाला तत्त्वाने जाणतो तो अविचल भक्तियोगाने युक्त होतो. म्हणून अर्जुन भगवंताला विचारतात की, निरंतर चिंतन करत मी आपल्याला कसे जाणून घेऊ?

**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया**—आठव्या अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, जो अनन्यचित्त होऊन नित्य निरंतर माझे स्मरण करतो, त्या योग्याला मी सुलभतेने प्राप्त होतो. पुढे नवव्या अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, जो अनन्यभक्त माझे निरंतर चिंतन करत असतो, त्याचा योगक्षेम मी स्वतः वहन करतो. अशाप्रकारे चिंतनाचे माहात्म्य ऐकून अर्जुन म्हणतात की, ज्या चिंतनाने मी आपणाला तत्त्वाने जाणून घेऊ, ते चिंतन मी कुठे कुठे करू? कोणत्या वस्तू, व्यक्ती, देश, काल, घटना, परिस्थिती इत्यादीच्या ठिकाणी मी आपले चिंतन करू? (या ठिकाणी चिंतन करणे साधन आहे आणि भगवंताना तत्त्वाने जाणून घेणे साध्य आहे)

येथे अर्जुनाने तर विचारले आहे की, मी कुठे कुठे, कोणकोणत्या वस्तू, व्यक्ती, स्थान इत्यादीच्या ठिकाणी आपले चिंतन करू; परंतु भगवंतांनी पुढे उत्तर दिले आहे की, जेथे जेथे तू चिंतन करशील तेथे तेथेच तू मला समज. तात्पर्य मी तर सर्व वस्तू, व्यक्ती, देश, काल, इत्यादीत परिपूर्ण आहे. म्हणून एखादी विशेषता, महत्ता, सुन्दरता या-कडे जेथे जेथे तुझे मन जाईल, तेथे तेथे तू माझेच चिंतन कर. अर्थात् त्या ठिकाणी त्या विशेषता इत्यादिकांना माझी-च समज. कारण संसाराची विशेषता मानल्याने संसाराचे चिंतन होईल आणि माझी विशेषता मानल्याने माझेच चिंतन होईल. अशाप्रकारे संसाराचे चिंतन माझ्या चिंतनात परिणत झाले पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाच्या प्रश्नाचे तात्पर्य हे आहे की, हे भगवन्! आपण कोण-कोणत्या रूपात प्रकट झाला आहात,

ज्या रूपात मी आपले चिंतन करू शकेल? अर्जुनाने हा प्रश्न सुगमतापूर्वक भगवत्प्राप्तीच्या उद्देशाने केला आहे. अर्जुन संपूर्ण साधकांचे प्रतिनिधी आहेत. म्हणून त्यांचा प्रश्न साधकांसाठी आहे.

अर्जुन भगवान् श्रीकृष्णाला तर जाणत होते, परंतु त्यांच्या समग्ररूपाला जाणत नव्हते. त्यांच्यात भगवंताच्या समग्ररूपाला जाणण्याची जिज्ञासा होती. म्हणून ते विचारतात की, मी आपल्या समग्ररूपाला कसे जाणू? कोणत्या रूपात मी आपले चिंतन करू? यावरुन सिद्ध होते की, विभूती गौण नाहीत, तर भगवत्प्राप्तीचे माध्यम असल्यामुळे मुख्य आहेत. विभूतिरूपाने साक्षात्-भगवान्‌च आहेत. जोपर्यंत मनुष्य भगवंताला जाणत नाही, तोपर्यंत त्याच्यात गौण अथवा मुख्य ही भावना राहते. भगवंताला जाणल्यावर गौण अथवा मुख्य ही भावना राहत नाही. कारण भगवंताशिवाय काही नाहीच, तर मग त्यात काय गौण आणि काय मुख्य? तात्पर्य हे आहे की, गौण अथवा मुख्य साधकाच्या दृष्टींत आहे, भगवान् आणि सिद्ध यांच्या दृष्टीत नाही.

## विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन।
## भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्॥ १८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जनार्दन** | = हे जनार्दन! | **विस्तरेण** | = विस्ताराने | | वचन |
| **आत्मनः** | = (आपण) आपल्या | **भूयः** | = पुन्हा | **शृण्वतः** | = श्रवणाने |
| **योगम्** | = योगाला (सामर्थ्याला) | **कथय** | = सांगा; | **मे** | = माझी |
| **च** | = आणि | **हि** | = कारण | **तृप्तिः** | = तृप्ती |
| **विभूतिम्** | = विभूतींना | **अमृतम्** | = (आपले) अमृतमय | **अस्ति, न** | = होत नाही. |

***व्याख्या*— विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन—** भगवंतांनी सातव्या आणि नवव्या अध्यायात ज्ञान-विज्ञानाचा विषय खूप विस्ताराने सांगितला. इतके सांगूनही त्यांची तृप्ती झाली नाही. म्हणून दहावा अध्याय आपल्याकडूनच सांगणे सुरू केले. त्यांनी दहाव्या अध्यायाच्या आरंभी म्हटले आहे की, ''तू पुन्हा माझ्या श्रेष्ठ वचनाला ऐक'' असे ऐकल्याने भगवंताची कृपा आणि त्यांच्या महत्त्वाकडे अर्जुनाची दृष्टी विशेषतेने जाते आणि ते भगवंताला पुन्हा ऐकविण्यासाठी प्रार्थना करतात. अर्जुन म्हणतात की, ''आपण आपला योग आणि विभूती यांना विस्ताराने पुन्हा सांगावे. कारण आपले अमृतमय वचन श्रवण करून माझी तृप्ती होत नाही. मनाची इच्छा अशी आहे की, ऐकतच रहावे.''

भगवंताच्या विभूतींना ऐकल्याने भगवंताविषयी प्रत्यक्ष आकर्षण वाढल्याचा अनुभव आल्याने अर्जुनाला वाटले की, या विभूतींच्या ज्ञानाने भगवंताचे ठिकाणी माझे विशेष आकर्षण निर्माण होईल आणि त्यांचे ठिकाणी माझी सहजच दृढ भक्ती निर्माण होईल. म्हणून अर्जुन पुन्हा विस्ताराने सांगण्याविषयी प्रार्थना करत आहेत.

**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्**—अर्जुन कल्याणाचे साधन इच्छितात (२।७; ३।२; ५।१) आणि भगवंतांनी विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणण्याचे फल आपल्याविषयी दृढ भक्ती होणे सांगितले (१०।७). म्हणून अर्जुनाला विभूती जाणून घेण्याची गोष्ट सरळ सोपी वाटली की, मला कोणते नवीन काम करावयाचे नाही, नवीन चिंतन करावयाचे नाही, तर जेथे-कोठे विशेषतेला अनुसरून मनाचे स्वाभाविक आकर्षण होईल तेथे त्या विशेषतेला भगवंताचे मानावयाचे आहे. यामुळे मनाच्या वृत्तीचा प्रवाह संसाराकडे न राहता भगवंताकडे होईल, त्यामुळे माझी भगवंताचे ठिकाणी दृढ भक्ती होईल आणि माझे सुगमतेने कल्याण होईल. केवढी साधी, सरळ आणि सोपी गोष्ट आहे. म्हणून अर्जुन विभूतींना पुन्हा सांगण्यासाठी प्रार्थना करत आहेत.

जसे एखादा भोजन करण्यास बसला आणि भोजनात त्याला एखादी वस्तू विशेष आवडली तर, त्या वस्तूविषयी रुची वाढत असते आणि तो वारंवार ती वस्तू मागत असतो. परंतु त्या रुचीत दोन बाधा येतात. एक—जर ती वस्तू कमी प्रमाणातच तयार झालेली असेल तर, पूर्ण तृप्ती होईपर्यंत मिळणार नाही आणि दुसरे—ती वस्तू अधिक प्रमाणात उपलब्ध असूनही पोट भरल्याने अधिक खाल्ली जाऊ शकत नाही. परंतु भगवंताच्या विभूतींचा आणि अर्जुनाच्या विभूती ऐकण्याच्या आवडीचा अंतच लागत नाही. कानांनी अमृतमय वचने ऐकताना त्या वचनांचा अंतच होत नाही आणि त्यांना ऐकताना तृप्तीही होत नाही. म्हणून अर्जुन भगवंताला प्रार्थना करून म्हणतात की, आपण आपली अशी अमृतवचने मला ऐकवीतच रहावे.

**परिशिष्ट भाव**—जसे भुकेल्याला अन्न आणि तहानेल्याला पाणी गोड लागते, तसेच जिज्ञासू अर्जुनाला भगवंताचे वचन

फार विलक्षण वाटत आहेत. त्यांना भगवंताची वचने जस-जशी विलक्षण दिसतात तस-तसे त्यांचा भगवंताविषयी विशेष भाव प्रकट होत आहे.*

*संबंध—अर्जुनाची प्रार्थना स्वीकार करून भगवान् आता पुढील श्लोकापासून आपल्या विभूती आणि योग सांगण्यास सुरवात करत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे॥ १९॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हन्त** | = होय, ठीक आहे. | **प्राधान्यतः** | = प्रधानतेने (संक्षेपाने) | **कुरुश्रेष्ठ** | = हे कुरूश्रेष्ठ! |
| **दिव्याः,** | = मी आपल्या | | | **मे** | = माझ्या विभूतींच्या |
| **आत्मविभूतयः** | दिव्य विभूती | **कथयिष्यामि** | = सांगेन; | **विस्तरस्य** | = विस्ताराचा |
| **ते** | = तुला | **हि** | = कारण | **अन्तः, न, अस्ति** | = अंत नाही. |

*व्याख्या*— **हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः**—योग आणि विभूती सांगण्यासाठी अर्जुनाची जी प्रार्थना आहे, त्याला "**हन्त**" अव्ययाने स्वीकार करून भगवान् म्हणतात की, मी आपल्या दिव्य, अलौकिक आणि विलक्षण विभूती तुला सांगतो (योगाची गोष्ट भगवंतांनी पुढे एक्केचाळीसाव्या श्लोकात सांगितली आहे)

**दिव्याः**—हे म्हणण्याचे तात्पर्य, ज्या कोणत्या वस्तू, व्यक्ती, घटना, इत्यादीत जी काही विशेषता दिसते, ती वस्तुतः भगवंताचीच आहे. म्हणून तिला भगवंताचीच म्हणून पाहणे दिव्यता आहे आणि वस्तू, व्यक्ती इत्यादीची ती विशेषता पाहणे अदिव्यता अर्थात् लौकिकता आहे.

**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे**—जेव्हा अर्जुनाने भगवंताला म्हटले की, आपण आपल्या विभूती विस्ताराने संपूर्णपणे सांगा; तेव्हा भगवान् म्हणतात की, मी आपल्या विभूती संक्षेपाने सांगतो कारण माझ्या विभूतींचा अंत लागत नाही. परंतु पुढे अकराव्या अध्यायात, जेव्हा अर्जुन अति संकोचाने म्हणतात की, मी आपले विश्वरूप पाहू इच्छितो. जर ते रूप माझ्याकडून पाहिले जाणे शक्य असेल तर मला दाखवा. तेव्हा भगवान् म्हणतात, "**पश्य मे पार्थ रूपाणि**" (११।५) अर्थात् तू माझ्या रूपांना पाहून घे. रूपात किती रूपे? काय दोन चार? नव्हे नव्हे शेकडो हजारो रूपांना पहा. अशाप्रकारे येथे अर्जुनाची विस्ताराने विभूती सांगण्याची प्रार्थना ऐकून भगवान् संक्षेपाने विभूती ऐक म्हणतात आणि तेथे अर्जुनाची एक रूप दाखविण्याची प्रार्थना ऐकून भगवान् शेकडो हजारो रूपे पाहण्यासाठी म्हणतात.

या ठिकाणी एक फार मोठी आश्चर्याची गोष्ट आहे की, माणूस खूप ऐकू शकतो पण तितके डोळ्याने पाहू शकत नाही कारण पाहण्याची शक्ती कानापेक्षा सीमित असते.*

---

* द्रष्टव्य—'गीता दर्पण' पुस्तकाचा बारावा लेख—'गीतेत भगवंताचे विविधरूपाने प्रकट होणे.'

* कानाचा विषय शब्द आहे. शब्द दोन प्रकारचा असतो वर्णात्मक आणि ध्वन्यात्मक. कानाद्वारा शब्द ऐकून आपल्याला प्रत्यक्षाचेही ज्ञान होत असते आणि अप्रत्यक्षाचेही (स्वर्ग-नरक इत्यादी) ज्ञान होत असते. म्हणून वेदान्त प्रक्रियेत (श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादीत) "श्रवण" सर्वात प्रथम आले आहे. तसेच भक्तीतही (श्रवण, कीर्तन, स्मरण, पाद सेवन इत्यादीत) "श्रवण" प्रथम आले आहे. शास्त्रामध्ये ज्या परमात्मतत्त्वाचे वर्णन केले गेले आहे त्याचे ज्ञान (परोक्ष ज्ञान) आपणाला कानानेच होत असते अर्थात् कानाने ऐकूनच त्यानुसार करून, मानून घेऊन, अथवा जाणून घेऊन आपण त्या परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेत असतो.

शब्दात अचिंत्य शक्ती असते—

शब्दशक्तेरचिन्त्यत्वाच्छब्दादेवापरोक्षधीः। प्रसुप्तः पुरुषो यद्वच्छब्देनैवावबुध्यते॥ (सदाचारानुसन्धानम् १९)

मनुष्य झोपतो त्या वेळी झोपेत इंद्रिये संकुचित होऊन मनात, मन संकुचित होऊन बुद्धीत आणि बुद्धी संकुचित होऊन अज्ञानात (अविद्या) लीन होत असते. जरी अशाप्रकारे इंद्रिये फारच लपलेली असतात, तरीपण झोपलेल्या माणसाला त्याचे नाव घेऊन हाक मारले तर तो जागा होतो. शब्दात इतकी शक्ती आहे की, ती अविद्येत लीन झालेल्याला देखील जागे करते. म्हणून शब्दात अनंत शक्ती असते. दृष्टी तर पदार्थापर्यंत जाऊन थांबते. परंतु शब्द केवळ कानापर्यंतच जात नाही तर स्व पर्यंत चालला जातो.

नेत्राने रूप आकर्षण केले जाते. जसे आरशात रूप पाहताना काचेच्या आत रूप जाते, तेव्हा त्यात मुख दिसू लागते. तसेच डोळ्यातही एक काच आहे, ज्याच्या आत पदार्थाचे रूप चालले जाते, तेव्हा तो पदार्थ दिसू लागतो. डोळ्यात विशेष शक्ती ही आहे की, ते पूर्वीच्या रूपाला ग्रहण करूनच दुसरे

तरीपण जेव्हा अर्जुनाने संपूर्ण विभूती ऐकण्याविषयी आपले सामर्थ्य व्यक्त केले तेव्हा भगवंतांनी संक्षेपाने ऐकण्यासाठी सांगितले आणि जेव्हा अर्जुनाने एका रूपाला दाखविण्याविषयी नम्रतेने आपली असमर्थता प्रगट केली, तेव्हा भगवंतांनी अनेक रूपे पाहण्यास सांगितले. याचे कारण गीतेत अर्जुनाचे ज्ञान उत्तरोत्तर वाढत जात आहे. या दहाव्या अध्यायात जेव्हा भगवंतांनी हे म्हटले की, माझ्या विभूतींचा अंत लागत नाही तेव्हा अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या अनंततेकडे वळली. त्यांनी समजून घेतले की, भगवंताच्या विषयात तर मी काहीही जाणत नाही; कारण भगवान् अनंत आहेत, अपार आहेत. परंतु अर्जुनाने अज्ञानाने असे म्हटले की, आपण आपल्या संपूर्ण विभूती सांगा. म्हणून अर्जुन पुढे सावधान होतात आणि नम्रतेने एक रूप दाखविण्यासाठीच प्रार्थना करतात. डोळ्यांची शक्ती सीमित असतानाही भगवान् दिव्य चक्षू प्रदान करून अर्थात् चर्मचक्षूमध्ये विशेष शक्ती प्रदान करून आपल्या अनेक रूपांना पाहण्याची आज्ञा देतात.

दुसरी गोष्ट वक्त्याची व्यक्तिगत गोष्ट विचारणे आणि आपली अज्ञता तसेच अयोग्यता असताना वक्त्याला जाणून घेण्यासाठी प्रार्थना करणे, या दोन्हीत फरक असतो. या ठिकाणी अर्जुनाने विस्तारपूर्वक विभूती सांगा म्हणून भगवंताचा थांग काढण्याची इच्छा व्यक्त केली तर भगवंतांनी सांगितले, मी तर संक्षेपाने सांगतो, कारण माझ्या विभूतींचा अन्तच लागत नाही. अकराव्या अध्यायात अर्जुनाने आपली अज्ञता आणि अयोग्यता प्रगट करीत भगवंताला आपले अव्ययरूप दाखविण्याची प्रार्थना केली, तर भगवंतानी आपले अनंतरूप पाहण्याची आज्ञा केली आणि त्याला पाहण्यासाठी सामर्थ्यही (दिव्य दृष्टी) दिले. म्हणून साधकाने किंचिन्मात्रही आपला आग्रह, अहंकार न ठेवता आणि आपले सामर्थ्य, बुद्धी न लावता केवळ भगवंतावरच संपूर्णपणे निर्भर रहावे, कारण भगवंतावर निर्भर राहिल्याने जी वस्तू मिळत असते, ती अपार मिळत असते.

**परिशिष्ट भाव**—भगवान् अनन्त आहेत, म्हणून त्यांच्या विभूतीही अनंत आहेत. या कारणामुळे भगवंताच्या विभूतींच्या विस्ताराला तर कोणी सांगूही शकत नाही आणि कोणी ऐकूही शकत नाही. जर कोणी सांगितले—ऐकले तर मग ते अनंत कसे असतील? म्हणून भगवान् म्हणतात की, मी आपल्या विभूतींना संक्षेपाने सांगेन.

अर्जुनाला '**कुरुश्रेष्ठ**' संबोधण्यात भगवंताचे तात्पर्य हे आहे की, तुझ्या मनात मला जाणून घेण्याची इच्छा झाली, म्हणून तू श्रेष्ठ आहेस!

***संबंध***—*विभूती आणि योग या दोन्हींपैकी प्रथम भगवान् वीसाव्या श्लोकापासून एकोणचाळीसाव्या श्लोकांपर्यंत आपल्या-ब्यांशी विभूतींचे वर्णन करतात.*

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च॥२०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **गुडाकेश** | = हे निद्राजित अर्जुन! | **च** | = आणि | **स्थितः** | अंतःकरणात (हृदयात) स्थित |
| **भूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांच्या | **अन्तः** | = अंती | | |
| | | **अहम्, एव** | = मीच आहे | | |
| **आदिः** | = आदि, | **च** | = आणि | **आत्मा** | = आत्माही |
| **मध्यम्** | = मध्य | **सर्वभूताशय-** | = संपूर्ण प्राण्यांच्या | **अहम्** | = मीच आहे. |

***व्याख्या***— [भगवंताचे चिंतन दोन पद्धतीने होत असते (१) साधक आपले जे इष्ट मानतो, त्याच्याशिवाय दुसरे कशाचेही चिंतन होऊ नये. यदा कदाचित झाले तरी, मनाला तेथून परावृत्त करून आपल्या इष्ट देवाच्या चिंतनातच प्रवृत्त करावे. (२) मनात

रूप पाहत असतात. याच कारणाने जेव्हा विजेने पंखा चालू होतो तेव्हा त्याची तीन पाते वेगवेगळी फिरत असली तरी डोळ्यांना, (वेगवेगळया पात्यांचे फिरणे दिसत नसून)एका चक्रासाखे दिसत असते. असे असूनही कानात जितकी शक्ती आहे तितकी डोळ्यात नसते.

इंद्रिये केवळ आपापल्या विषयालाच ग्रहण करू शकतात, परमात्मतत्त्वाला ग्रहण करू शकत नाहीत, कारण परमात्मतत्त्व इंद्रियांचा विषय नव्हे. परमात्मतत्त्व स्व चा विषय आहे अर्थात् त्याचे ज्ञान स्व नेच होत असते. म्हणून अर्जुनाने या अध्यायामध्ये म्हटले आहे की, आपण स्वतः नेच स्वतः ला जाणत असता ''स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वम्'' (१०।१५). दुसऱ्या अध्यायामध्ये भगवंतांनी सांगितले आहे की, मनात येणाऱ्या संपूर्ण कामनांचा त्याग झाल्यावर मनुष्य आपल्यातच आपण आपल्याने संतुष्ट होत असतो-''प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्।'' आत्मन्येवात्मना तुष्टः'' (२।५५) तात्पर्य, परमात्मतत्त्वाचे ज्ञान करणनिरपेक्ष आहे. त्या ज्ञानाला डोळे ग्रहण करू शकत नाहीत, परंतु कान शब्दद्वारा ग्रहण करून स्व पर्यंत पोहचवितो

सांसारिक विशेषतेच्या अनुषंगाने चिंतन होत असेल, तर त्या विशेषतेला भगवंताचीच विशेषता समजावी. या दुसऱ्या चिंतनासाठीच येथे विभूतींचे वर्णन आहे. तात्पर्य, कोणत्याही विशेषतेला अनुसरून जेथे कोठे वृत्ती जाईल तेथे भगवंताचेच चिंतन झाले पाहिजे, त्या वस्तू-व्यक्तीचे नव्हे. यासाठीच भगवान् विभूतींचे वर्णन करीत आहेत.]

**अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च***—येथे भगवंतांनी आपल्या संपूर्ण विभूतींचा सार सांगितला आहे की, संपूर्ण प्राण्यांच्या आदि, मध्य आणि अंती मीच आहे. हा नियम आहे की, जी वस्तू उत्पत्ति-विनाशशील असते; त्याच्या आरंभी आणि अंती जे तत्त्व असते, तेच तत्त्व त्याच्या मध्यातही असते (मग ते दिसो अथवा न दिसो) अर्थात् जी वस्तू ज्या तत्त्वाने उत्पन्न होत असते आणि ज्याच्यात लीन होत असते, त्या वस्तूच्या आदि, मध्य आणि अंती (सर्व काळात) तेच तत्त्व राहत असते. जसे, सोन्यापासून तयार झालेले दागिने पूर्वी सोनेरूप होते आणि अंती (दागिने सोन्यात लीन झाल्यावर) सोनेरूपच राहतात, तसेच मध्यातही सोनेरूपच असतात. केवळ नाव, आकृती, उपयोग, माप, वजन इत्यादी वेगवेगळे असतात. हे वेगवेगळे असले तरीही दागिने हे सोनेच असतात. तसेच, संपूर्ण प्राणी आदितही परमात्मस्वरूप होते आणि अंती लीन झाल्यावरही परमात्मस्वरूप राहतील तसेच मध्यात नाव, रूप, आकृती, क्रिया, स्वभाव इत्यादी वेगवेगळे असतानाही, तत्त्वतः परमात्मस्वरूपच आहेत—हे दाखविण्यासाठीच येथे भगवंतांनी आपल्याला संपूर्ण प्राण्यांचा आदि, मध्य आणि अंती असल्याचे म्हटले आहे.

भगवंतांनी विभूतींच्या या प्रकरणात आदि, मध्य आणि अंती—तीन ठिकाणी साररूपाने आपल्या विभूतींचे वर्णन केले आहे. प्रथम या वीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले की, ''संपूर्ण प्राण्यांच्या आदि, मध्य आणि अंती मीच आहे'', मधल्या बत्तीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, ''संपूर्ण सर्गाच्या आदि, मध्य आणि अंती मीच आहे'' आणि अंताच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, ''संपूर्ण प्राण्यांचे जे बीज आहे ते मीच आहे कारण माझ्याशिवाय कोणीही चर-अचर प्राणी नाही.'' चिंतन करण्यासाठी हेच विभूतींचे सार आहे. तात्पर्य, एखाद्या विशेषतेला अनुसरून ज्या विभूती सांगितल्या गेल्या आहेत, त्या विभूती व्यतिरिक्तही जे काही दिसत असते, ते देखील भगवंताचीच विभूती आहे हे दाखविण्यासाठी भगवंतांनी आपणाला संपूर्ण चराचर प्राण्यांच्या आदि, मध्य आणि शेवटी विद्यमान असल्याचे म्हटले आहे. तत्त्वाने सर्व काही परमात्माच आहे-''**वासुदेवः सर्वम्**'' हा मुद्दा दाखविण्या-साठीच विभूती सांगितल्या गेल्या आहेत.

या वीसाव्या श्लोकात भगवंतांनी प्राण्यांच्या ठिकाणी जो आत्मा आहे, जीवाचे जे स्वरूप आहे, त्याला आपली विभूती म्हटले आहे. पुढे बत्तीसाव्या श्लोकात भगवंतांनी सृष्टिरूपाने आपली विभूती दाखविली की, जी जड-चेतन, स्थावर जंगम सृष्टी आहे, त्याच्या आदित ''मी एकच अनेक रूपाने व्हावे.'' (''**बहु स्यां प्रजायेयेति**'' छन्दोग्य० ६।२।३) असा संकल्प करतो आणि अंती मीच शिल्लक राहतो. ''**शिष्यते शेषसंज्ञः**'' (श्रीमद्भा० १०।३।२५) म्हणून मध्यातही सर्व काही मीच आहे ''**वासुदेवः सर्वम्**'' (७।१९) ''**सदसच्चाहमर्जुन**'' (९।१९). कारण जे तत्त्व आदि आणि अंती असते, तेच तत्त्व मध्यातही असते. शेवटी एकोणचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी बीजरूपाने (कारण) आपली विभूती सांगितली की, मीच सर्वांचे बीज आहे, माझ्याशिवाय कोणताही प्राणी नाही. अशाप्रकारे या तीन ठिकाणी—तीन श्लोकात मुख्य विभूती सांगितल्या गेल्या आहेत आणि इतर श्लोकात ज्या समुदायात मुख्य आहेत, ज्यांचे समुदायावर अधिपत्य आहे, ज्यांचे ठिकाणी एखादी विशेषता आहे त्यांना अनुसरून विभूती सांगितल्या गेल्या आहेत. परंतु साधकाने त्या विभूतींची महत्ता, विशेषता, सुन्दरता, अधिपत्य इत्यादीकडे लक्ष देऊ नये, तर ह्या सर्व विभूती भगवंतापासूनच प्रगट होतात, यांच्या ठिकाणी जी महत्ता इत्यादी आहे, ती केवळ भगवंताचीच आहे. ह्या विभूती भगवत्स्वरूपच आहेत, ह्याकडे लक्ष द्यावे. कारण अर्जुनाचा प्रश्न भगवंताच्या चिंतनाच्या विषयासंबंधी आहे (१०।१७); एखाद्या वस्तू, व्यक्तीच्या चिंतनाच्या संबंधात नाही.

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः**—साधकाने या विभूतींचा उपयोग कसा करावा? त्यासाठी हे दाखवितात

* येथे ''आदिः'' आणि ''अन्तः'' शब्दांचा प्रयोग पुल्लिंगात आणि ''मध्यम्'' शब्दाचा प्रयोग ''नपुंसकलिंगात'' केला गेला आहे. याचे तात्पर्य, सुरवातीला एकटे परमपुरुष भगवान् राहत असतात ''अहमादिर्हि देवानां महर्षिणां च सर्वशः'' (१०।२) आणि शेवटीही एकटे परमपुरुष भगवान् राहतात. ''शिष्यते शेषसंज्ञः'' (श्रीमद्भागवत् १०।३।२५). म्हणून भगवंतांनी ''आदि'' आणि ''अन्त'' शब्दाचा प्रयोग पुल्लिंगात केला आहे. परंतु मध्यात अर्थात् सृष्टीच्या वेळी पुल्लिंग स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग तिन्ही लिंगात व्यक्ती, वस्तू, पदार्थ, क्रिया, भाव इत्यादी राहत असतात. म्हणून या तिन्ही लिंगात नपुंसक- लिंगच बाकी राहते अर्थात् नपुंसकलिंगाच्या अंतर्गतच तिन्ही लिंग येतात. म्हणून भगवंतानी येथे आणि पुढे बत्तीसाव्या श्लोकातही ''मध्य'' शब्दाचा प्रयोग नपुंसकलिंगात केला आहे.

की, जेव्हा साधकाची दृष्टी प्राण्यांकडे जाईल, तेव्हा त्याने "संपूर्ण प्राण्यांत आत्मारूपाने भगवंतच आहेत"-अशाप्रकारे भगवंताचे चिंतन करावे. जेव्हा एखाद्या विवेकी साधकाची दृष्टी सृष्टीकडे जाईल त्यावेळी त्याने, "उत्पत्ति-विनाशशील आणि निरंतर परिवर्तन होणाऱ्या सृष्टीच्या आदि, मध्य आणि अंती एक भगवंतच आहेत" याप्रमाणे त्याने भगवंताचे चिंतन करावे. कधी प्राण्यांच्या मूळाकडे त्याची दृष्टी गेली तर त्यावेळी ते "बीजरूपाने भगवान्‌च आहेत भगवंताशिवाय कोणताही चर-अचर प्राणी नाही आणि असू शकतही नाही." अशा प्रकारे भगवंताचे चिंतन करावे.

**परिशिष्ट भाव**—संपूर्ण प्राण्यांच्या आदि, मध्य आणि अंती भगवानच आहेत—याचे तात्पर्य हे आहे की, एका भगवंताशिवाय दुसरे काही नाहीच अर्थात् सर्व काही भगवान्‌च आहेत.

भगवान् श्रीकृष्ण समग्र आहेत आणि आत्मा त्यांची विभूती आहे. आत्मा भगवंताची 'परा-प्रकृती' आहे आणि अंतःकरण 'अपरा-प्रकृती' आहे (गीता ७। ४-५). परा आणि अपरा—दोन्हीही भगवंताशी अभिन्न आहेत.

## आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्।
## मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी*॥ २१ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = मी | **अंशुमान्** | = किरणे असलेला | **मरीचिः** | = तेज (आणि) |
| **आदित्यानाम्** | = अदितीच्या पुत्रात | | | **नक्षत्राणाम्** | = नक्षत्रांचा अधिपती |
| **विष्णुः** | = विष्णु (वामन) | **रविः** | = सूर्य आहे. | | |
| **ज्योतिषाम्** | = (आणि) प्रकाशमान वस्तूत | **अहम्** | = मी | **शशी** | = चंद्रमा |
| | | **मरुताम्** | = मरुतांचे | **अस्मि** | = आहे. |

***व्याख्या*— आदित्यानामहं विष्णुः**—अदितीचे धाता, मित्र इत्यादी जितके पुत्र आहेत, त्यात "विष्णू" अर्थात् वामन मुख्य आहेत. भगवंतांनीच वामनरूपाने अवतार घेऊन दैत्यांच्या संपत्तीला दानरूपाने घेतले आणि अदितीच्या पुत्रांना (देवतांना) ती संपत्ती देऊन टाकली.†

**ज्योतिषां रविरंशुमान्**—चंद्र, नक्षत्र, तारे, अग्नी इत्यादी जितक्या काही प्रकाशमान वस्तू आहेत त्यात किरणे असणारा सूर्य माझी विभूती आहे. कारण प्रकाश करण्यात सूर्याची मुख्यता आहे. सूर्याच्या प्रकाशानेच सर्व प्रकाशमान होत असतात.

**मरीचिर्मरुतामस्मि**—सत्त्व ज्योती, आदित्य, हरित इत्यादी नावाचे जे एकोणपन्नास मरुत आहेत त्यांचे मुख्य तेज मी आहे. त्या तेजाच्या प्रभावानेच, इंद्राकडून दितीच्या गर्भाचे सात तुकडे केल्यावर आणि नंतर त्या सातांचे सात-सात तुकडे केल्यावरही, ते मेले नाहीत तर एकापासून एकोणपन्नास झाले.

**नक्षत्राणामहं शशी**—अश्विनी, भरणी, कृत्तिका इत्यादी जी सत्तावीस नक्षत्रे आहेत त्या सर्वांचा अधिपती चंद्र मीच आहे.

या विभूतीत जी विशेषता-महत्ता आहे ती वास्तविक भगवंताची आहे

[या प्रकरणात ज्या विभूतींचे वर्णन आले आहे, त्यांना भगवंतांनी विभूतीरूपाने सांगितले आहे, अवतार- रूपाने नव्हे. जसे अदिती पुत्रात वामन मी आहे (१०।२१), शस्त्रधाऱ्यांमध्ये राम मी आहे (१०।३१), वृष्णिवंशामध्ये वासुदेव (कृष्ण) आणि पांडवामध्ये धनंजय (अर्जुन) मी आहे (१०।३७) इत्यादी, कारण येथे विषय विभूतींचा आहे.]

## वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः।
## इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना॥ २२ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वेदानाम्** | = (मी) वेदांमध्ये | **सामवेदः** | = सामवेद | **देवानाम्** | = देवतांमध्ये |
| | | **अस्मि** | = आहे, | **वासवः** | = इन्द्र |

* या विभूतीत षष्ठीचा प्रयोग केला गेला आहे. षष्ठीचा प्रयोग निर्धारण अर्थात् प्रधान अर्थातही असतो आणि संबंधाच्या अर्थातही असतो. जेथे निर्धारणात षष्ठी असते तेथे हिंदीत "मे" विभक्तीचा प्रयोग होत असतो आणि जेथे संबंधाने षष्ठी असते तेव्हा हिन्दीच्या "का", "की" विभक्तींचा प्रयोग होत असतो. उदाहरणार्थ या श्लोकाच्या पूर्वार्धात निर्धारणाच्या अर्थात आणि उत्तरार्धात संबंधाच्या अर्थात षष्ठीचा प्रयोग झाला आहे.

† बारा महिन्यात जे बारा आदित्य असतात त्यात कार्तिक महिन्याच्या सूर्याचे नावही "विष्णू" आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अस्मि** | = आहे, | **मनः** | = मन | **भूतानाम्** | = प्राण्यांमध्ये |
| **इन्द्रियाणाम्** | = इंद्रियां-मध्ये | **अस्मि** | = आहे | **चेतना** | = चेतना |
| | | **च** | = आणि | **अस्मि** | = आहे |

*व्याख्या*— **वेदानां सामवेदोऽस्मि**—वेदांच्या ज्या ऋचा स्वरसहित गायल्या जातात, त्यांचे नाव सामवेद आहे. सामवेदात इंद्ररूपाने भगवंताच्या स्तुतीचे वर्णन आहे. म्हणून सामवेद भगवंताची विभूती आहे.

**देवानामस्मि वासवः**—सूर्य, चंद्र इत्यादी जितक्या काही देवता आहेत, त्या सर्वांत इंद्र मुख्य आहे आणि सर्वांचा अधिपती आहे. म्हणून भगवंतांनी त्याला आपली विभूती म्हटले आहे.

**इन्द्रियाणां मनश्चास्मि**—डोळे, कान इत्यादी सर्व इंद्रियात मन मुख्य आहे. सर्व इंद्रिय मनासह राहत असल्यानेच (मनाची साथ घेऊन) काम करत असतात. मनाची साथ नसल्यास इंद्रिये आपले काम करत नाहीत. जर मनाची साथ नसेल, तर इंद्रियांसमोर विषय आले तरी, विषयांचे ज्ञान होत नाही. मनात ही विशेषता भगवंतापासून-च आलेली असते. म्हणून भगवंताने मनाला आपली विभूती म्हटले आहे.

**भूतानामस्मि चेतना**—संपूर्ण प्राण्यांची जी चेतना-शक्ती, प्राणशक्ती असते या शक्तीमुळे मृत मनुष्यापेक्षा झोपलेल्या मनुष्यात विलक्षणता दिसून येते. म्हणून त्या शक्तीला भगवंताने आपली विभूती म्हटले आहे.

या विभूतीत जी विशेषता असते ती भगवंतापासून आलेली असते. यांची स्वतंत्र सत्ता नसते.

## रुद्राणां शङ्करश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम्।
## वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम्॥ २३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **रुद्राणाम्** | = रुद्रांमध्ये | **अस्मि** | = मी आहे. | **शिखरिणाम्** | = शिखराच्या पर्वतांमध्ये |
| **शङ्करः** | = शंकर | **वसूनाम्** | = वसूंमध्ये | **मेरुः** | = सुमेरू पर्वत |
| **च** | = आणि | **पावकः** | = पवित्र करणारा अग्नी | **अहम्** | = मी |
| **यक्षरक्षसाम्** | = यक्ष-राक्षसांमध्ये | **च** | = आणि | **अस्मि** | = आहे. |
| **वित्तेशः** | = कुबेर | | | | |

*व्याख्या*— **रुद्राणां शङ्करश्चास्मि**—हर, बहुरूप, त्र्यंबक इत्यादी अकरा रुद्रांत शम्भू अर्थात् शंकर सर्वांचे अधिपती आहेत. हे कल्याण प्रदान करणारे आणि कल्याणस्वरूप आहेत. म्हणून भगवंतांनी यांना आपली विभूती म्हटले आहे.

**वित्तेशो यक्षरक्षसाम्**—कुबेर यक्ष आणि राक्षसांचे अधिपती आहेत आणि यांना धनाध्यक्ष या पदावर नियुक्त केले गेले आहे. सर्व यक्ष आणि राक्षसात मुख्य असल्याने हे भगवंताची विभूती आहेत.

**वसूनां पावकश्चास्मि**—धर, ध्रुव, सोम इत्यादी आठ वसूंमध्ये अनल अर्थात् पावक (अग्नी) सर्वांचे अधिपती आहेत. हे सर्व देवतांना यज्ञाचा हवि पोहचविणारे तसेच भगवंताचे मुख आहेत. म्हणून यांना भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

**मेरुः शिखरिणामहम्**—सोने, चांदी, तांबे इत्यादींची शिखरे असणारे जितके पर्वत आहेत, त्यात सुमेरू पर्वत मुख्य आहे. हा सोन्याचा आणि रत्नांचा भंडार आहे. म्हणून भगवंतांनी याला आपली विभूती म्हटले आहे.

या श्लोकात ज्या चार विभूती सांगितल्या आहेत त्यात जी काही विशेषता, महत्ता, दिसते ती विभूतीच्या रूपात मूळ परमात्म्यापासूनच आलेली आहे. म्हणून या विभूतीत परमात्म्याचेच चिंतन झाले पाहिजे.

## पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्।
## सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः॥ २४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **माम्** | = माझे स्वरूप | **सरसाम्** | = जलाश-यांमध्ये |
| **पुरोधसाम्** | = पुरोहितां-मध्ये | **विद्धि** | = समज. | | |
| | | **सेनानीनाम्** | = सेनापतींमध्ये | **सागरः** | = समुद्र |
| **मुख्यम्** | = मुख्य | **स्कन्दः** | = कार्तिकेय | **अहम्** | = मी |
| **बृहस्पतिम्** | = बृहस्पतीला | **च** | = आणि | **अस्मि** | = आहे. |

*व्याख्या*— **पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्**—संसारातील सर्व पुरोहितांमध्ये आणि विद्या-बुद्धीमध्ये बृहस्पती श्रेष्ठ आहेत. हे इंद्राचे गुरू तसेच देवतांचे कुल पुरोहित आहेत. म्हणून भगवंतांनी अर्जुनास बृहस्पतीला आपली विभूती जाणण्यासाठी (मानण्यासाठी) म्हटले आहे.

**सेनानीनामहं स्कन्दः**—स्कन्द (कार्तिकेय) शंकराचे पुत्र आहेत. यांना सहामुखे आणि बारा हात आहेत. हे देवतांचे सेनापती आहेत आणि संसारातील सर्व सेनापतींपेक्षा श्रेष्ठ आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

**सरसामस्मि सागरः**—या पृथ्वीवर जितके काही जलाशय आहेत, त्यात समुद्र सर्वात श्रेष्ठ आहे. संपूर्ण जलाशयाचा अधिपती समुद्र आहे आणि आपल्या मर्यादेत राहणारा तसेच गंभीर आहे. म्हणून भगवंतांनी त्याला आपली विभूती म्हटले आहे.

येथे या विभूतींची जी अलौकिकता दिसते, ही त्यांची सर्वांची स्वतःची नसते. ती भगवंताची असते आणि भगवंता-पासूनच आलेली असते. म्हणून यांना पाहिल्यावर भगवंताची-च स्मृती झाली पाहिजे.

## महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम्।
## यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः॥ २५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महर्षीणाम्** | = महर्षींमध्ये | **अक्षरम्** | = अक्षर अर्थात् प्रणव | **जप यज्ञः** | = जपयज्ञ (आणि) |
| **भृगुः** | = भृगु (आणि) | **अहम्** | = मी | **स्थावराणां** | = स्थिर राहणाऱ्यांमध्ये |
| **गिराम्** | = वाणीमध्ये (शब्दांमध्ये) | **अस्मि** | = आहे. | **हिमालयः** | = हिमालय |
| **एकम्** | = एक | **यज्ञानाम्** | = संपूर्ण यज्ञांमध्ये | **अस्मि** | = मी आहे. |

*व्याख्या*— **महर्षीणां भृगुरहम्**—भृगु, अत्रि, मरीचि इत्यादी महर्षींमध्ये भृगुजी मोठे भक्त, ज्ञानी आणि तेजस्वी आहेत. यांनीच ब्रह्मा, विष्णू आणि महेश या तिघांची परीक्षा घेऊन भगवान् विष्णूला श्रेष्ठ सिद्ध केले होते. भगवान् विष्णूंनीही आपल्या वक्षःस्थलावर यांच्या चरणचिन्हांना ''भृगुलता'' नावाने धारण केलेले आहे, म्हणून भगवान् यांना आपली विभूती म्हणतात.

**गिरामस्म्येकमक्षरम्**—सर्वात प्रथम तीन मात्रा असलेला प्रणव प्रगट झाला. मग त्यानंतर त्रिपदा गायत्री, त्रिपदा गायत्रीपासून वेद आणि वेदापासून शास्त्र, पुराण इत्यादी संपूर्ण वाङ्मयजगत् प्रगट झाले. म्हणून या सर्वांचे कारण असल्याने आणि या सर्वात श्रेष्ठ असल्याने भगवंतांनी या एक अक्षर-प्रणवाला आपली विभूती म्हटले. गीतेत इतर ठिकाणीही याचे वर्णन येते जसे,-''**प्रणवः सर्ववेदेषु**'' (७।८) संपूर्ण वेदांत प्रणव मी आहे, ''**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्। यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्॥**'' (८।१३) जो मनुष्य ॐ या एक अक्षर असलेल्या प्रणवाचे उच्चारण करून आणि भगवंताचे स्मरण करून शरीराचा त्याग करतो तो परमगतीला प्राप्त होतो. **तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपः क्रियाः।प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम्॥** (१७।२४), ''वैदिक लोकांचे शास्त्र-विहित यज्ञ, दान आणि तपरूप क्रिया प्रणवाचा उच्चार करून-च आरंभ होतात''

**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि**—मंत्रांनी जितके यज्ञ केले जातात, त्यात अनेक वस्तू-पदार्थांची, विधींची आवश्यकता पडत असते आणि ते करण्यात काहीना काही थोडा दोष-ही होत असतो. परंतु जपयज्ञ अर्थात् भगवंताच्या नामाचा जप करण्यात कोणत्याही पदार्थ अथवा विधीची आवश्यकता लागत नाही. हे करण्यात दोष होणे तर दूर राहिले उलट सर्व दोष नष्ट होतात. हे करण्यात सर्व स्वतंत्र आहेत. वेगवेगळ्या सांप्रदायात भगवंताच्या नामामध्ये फरक आहे, परंतु नाम-जपाने कल्याण होते. ही गोष्ट हिन्दू, मुसलमान, बौद्ध, जैन इत्यादी सर्व मानतात. म्हणून भगवंतांनी जपयज्ञाला आपली विभूती म्हटले आहे.

**स्थावराणां हिमालयः**—स्थिर राहणारे जितके काही पर्वत आहेत, त्या सर्वात हिमालय पर्वत तपश्चर्येचे स्थल असल्याने, महान पवित्र आहे आणि सर्व पर्वतांचा अधिपती आहे. गंगा-यमुना इत्यादी जितक्या तीर्थस्वरूप पवित्र नद्या आहेत त्या सर्व बहुतेक हिमालयातूनच उगम पावतात. भगवत्प्राप्तीत हिमालय स्थल फार सहायक आहे. आजही दीर्घायू मोठमोठे योगी आणि संतजन हिमालयाच्या गुहेत साधन-भजन करत असतात. नर-नारायण ऋषीही हिमालयात जगाच्या कल्याणासाठी आजही तपश्चर्या करत आहेत. हिमालय भगवान् शंकराची सासुरवाडी आहे आणि स्वतः शंकर भगवान्ही ह्याच्याच एका शिखरावर-कैलास पर्वतावर राहत असतात. म्हणून भगवंतांनी हिमालयाला आपली

विभूती म्हटले आहे.

संसारात जी काही विशेषता दिसून येते, तिला संसाराची समजल्याने मनुष्य त्यात फसतो ज्यामुळे त्याचे पतन होते. परंतु येथे भगवान् फारच सरळ साधन सांगत आहेत की, तुझे मन जेथे-कोठे, ज्या-कोण्या विशेषतेमुळे आकृष्ट होत असेल तेथे त्या विशेषतेला माझी समज की, ही विशेषता भगवंताची आहे आणि भगवंतापासून आलेली आहे, ही या परिवर्तनशील नाशवान् संसाराची नव्हे. असे समजून घेणल्याने आणि मानल्याने तुझे आकर्षण माझ्यातच होईल. तुझ्या मनात माझीच महत्ता राहील. त्यामुळे संसाराचे चिंतन नष्ट होऊन, माझेच चिंतन होईल ज्यामुळे तुझ्यात माझ्याविषयी प्रेम निर्माण होईल.

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः।**
**गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः॥ २६॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **सर्ववृक्षाणाम्** | = | संपूर्ण वृक्षांमध्ये | **नारदः** | = | नारद, | **सिद्धानाम्** | = | सिद्धांमध्ये |
| | | | **गन्धर्वाणाम्** | = | गंधर्वांमध्ये | **कपिलः** | = | कपिल |
| **अश्वत्थः** | = | पिंपळ, | **चित्ररथः** | = | चित्ररथ | **मुनिः** | = | मुनि |
| **देवर्षीणाम्** | = | देवर्षींमध्ये | **च** | = | आणि | | | (मी आहे). |

*व्याख्या*— **अश्वत्थः सर्ववृक्षाणाम्**—पिंपळ हा एक सौम्य वृक्ष आहे. याच्या खाली कोणतेही झाड वाढू शकते आणि हा डोंगर, घराचे छत, भींत इत्यादी कठोर जागेवर-ही उगवतो. पिंपळाच्या वृक्षाच्या पूजेचे खूप मोठे माहात्म्य आहे. आयुर्वेदात पुष्कळशा रोगांना नष्ट करण्याची शक्ती या पिंपळ वृक्षात सांगितली गेली आहे. या सर्व दृष्टीने भगवंतांनी पिंपळाला आपली विभूती म्हटले आहे.

**देवर्षीणां च नारदः**—देवर्षीही पुष्कळ आहेत आणि नारदही पुष्कळ आहेत. परंतु देवर्षी नारद एकच आहेत. हे भगवंताच्या मनोगतानुसार वागणारे आहेत आणि भगवंताला जशी लीला करावयाची असते, तशी पूर्वपीठिका हे पूर्वीच तयार करून ठेवत असतात. म्हणून नारदांना भगवंताचे मन म्हटले गेले आहे. हे नेहमी वीणा घेऊन भगवन्नाम संकीर्तन करत फिरत असतात. वाल्मिक आणि व्यासासारख्यांना उपदेश करून त्यांना रामायण आणि श्रीमद्भागवतासारखे ग्रंथ निर्माण करण्यात प्रवृत्त करविणारेही नारदच आहेत. नारदांच्या वचनावर मनुष्य, देवता, असुर, नाग इत्यादी सर्व विश्वास करतात. सर्व यांच्या वचनाला मान देतात आणि यांचा सल्ला घेतात. महाभारत इत्यादी ग्रंथात यांच्या अनेक गुणांचे वर्णन केले गेले आहे. येथे भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

**गन्धर्वाणां चित्ररथः**—स्वर्गात गायन करणारांना गंधर्व म्हणतात आणि त्या सर्व गंधर्वांत चित्ररथ मुख्य आहे. अर्जुनाची यांचेशी मित्रता होती. यांचेपासूनच अर्जुनाने गायन-विद्या शिकली होती. गायन कलेत अत्यंत निपुण आणि गंधर्वात मुख्य असल्याने भगवंतांनी यांना आपली विभूती म्हटले आहे.

**सिद्धानां कपिलो मुनिः**—सिद्ध दोन प्रकारचे असतात. एक तर साधन करून सिद्ध झालेले असतात आणि दुसरे जन्मजात सिद्ध असतात. कपिल मुनी जन्मजात सिद्ध आहेत आणि त्यांना आदि सिद्ध म्हटले जाते. हे कर्दम आणि देवहूतीपासून उत्पन्न झाले होते. हे सांख्य शास्त्राचे आचार्य आणि संपूर्ण सिद्धांचे गणाधीश आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

या सर्व विभूतीत जी विलक्षणता दिसून येते, ती मूळात तत्त्वाच्या दृष्टीने भगवंताचीच असते. म्हणून साधकाची दृष्टी भगवंताकडेच राहिली पाहिजे.

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम्।**
**ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम्॥ २७॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **अश्वानाम्** | = | घोड्यांमध्ये | | | नावाचा घोडा, | **नराणाम्** | = | मनुष्यांमध्ये |
| **अमृतोद्भवम्** | = | अमृताबरोबर समुद्रातून प्रकट झालेला | **गजेन्द्राणाम्** | = | श्रेष्ठ हत्तींमध्ये | **नराधिपम्** | = | राजा ह्या |
| | | | **ऐरावतम्** | = | ऐरावत नावाचा हत्ती | **माम्** | = | माझ्या विभूती |
| **उच्चैःश्रवसम्** | = | उच्चैःश्रवा | **च** | = | आणि | **विद्धि** | = | समज. |

*व्याख्या*— **उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम्**—समुद्रमंथनाचेवेळी प्रगट होणाऱ्या चौदा रत्नांपैकी उच्चैःश्रवा घोडा हे एक रत्न आहे. हे इंद्राचे वाहन आणि संपूर्ण घोड्यांचा राजा आहे. म्हणून भगवंतांनी त्याला आपली विभूती म्हटले आहे.

**ऐरावतं गजेन्द्राणाम्**—हत्तीच्या समुदायात जो श्रेष्ठ असतो त्याला गजेंद्र म्हणतात. अशा गजेंद्रांतही ऐरावत नावाचा हत्ती श्रेष्ठ असतो. उच्चैःश्रवा घोड्याप्रमाणे ऐरावत हत्तीची उत्पत्तीही समुद्रातूनच झाली आहे आणि हेसुद्धा इंद्राचे वाहन आहे. म्हणून भगवंतांनी याला आपली विभूती म्हटले आहे.

**नराणां च नराधिपम्**—संपूर्ण प्रजेचे पालन, संरक्षण, शासन करणारा असल्याने राजा संपूर्ण मनुष्यात श्रेष्ठ आहे. साधारण मनुष्यापेक्षा राजाचे ठिकाणी भगवंताची शक्ती अधिक राहत असते. म्हणून भगवंतांनी राजाला आपली विभूती म्हटले आहे.*

या विभूतीत जी बलवत्ता सामर्थ्य आहे ते भगवंतापासूनच आलेले आहे म्हणून त्यांना भगवंताचेच मानून भगवंताचेच चिंतन केले पाहिजे.

## आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक्।
## प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः॥ २८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आयुधानाम्** | = आयुधांमध्ये | **अस्मि** | = आहे. | **अस्मि** | = मी आहे |
| **वज्रम्** | = वज्र (आणि) | **प्रजनः** | = संतान-उत्पत्तीचा हेतू | **च** | = आणि |
| **धेनुनाम्** | = धेनूंमध्ये | | | **सर्पाणाम्** | = सर्पांमध्ये |
| **कामधुक्** | = कामधेनू | | | **वासुकिः** | = वासुकी |
| **अहम्** | = मी | **कन्दर्पः** | = कामदेव | **अस्मि** | = मी आहे. |

*व्याख्या*— **आयुधानामहं वज्रम्**—ज्याच्या साहाय्याने युद्ध केले जाते त्याला आयुध (शस्त्रास्त्र) म्हणतात. त्या आयुधात इंद्राचे वज्र मुख्य आहे. हे वज्र दधीची ऋषींच्या हाडापासून तयार झालेले आहे आणि यांत दधीची ऋषींच्या तपश्चर्येचे तेज आहे. म्हणून भगवंतांनी वज्राला आपली विभूती म्हटले आहे.

**धेनूनामस्मि कामधुक्**—नवीन व्यालेली गाय धेनू म्हणविली जाते. सर्व धेनूंमध्ये कामधेनू मुख्य आहे, जी समुद्रमंथनातून प्रगट झाली होती. ही सर्व देवता आणि मनुष्यांची कामनापूर्ती करणारी आहे. म्हणून ही भगवंताची विभूती आहे.

**प्रजनश्चास्मि कन्दर्पः**—संपूर्ण संसाराची उत्पत्ती कामापासूनच होत असते. धर्मानुकूल केवळ सन्तानाच्या उत्पत्तीसाठी, सुखबुद्धीचा त्याग करून, ज्या कामाचा उपयोग केला जातो, तो काम भगवंतांची विभूती आहे. सातव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकातही भगवंतांनी कामाला आपली विभूती म्हटले आहे. "**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ**" अर्थात् सर्व प्राण्यांमध्ये धर्मानुकूल काम मी आहे.

**सर्पाणामस्मि वासुकिः**—वासुकी संपूर्ण सर्पांचे अधिपती आणि भगवंताचे भक्त आहेत. समुद्रमंथनाचे वेळी यांचीच मंथन-दोरी बनविली गेली होती. म्हणून भगवंताने यांना आपली विभूती म्हटले आहे.

या विभूतीत जी विलक्षणता दिसून येते, ती प्रतिक्षणाला परिवर्तन होणाऱ्या संसाराची होऊच कशी शकते ? ती तर परमात्म्याचीच आहे.

## अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम्।
## पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम्॥ २९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **नागानाम्** | = नागांमध्ये | **अहम्** | = मी | **संयमताम्** | = शासन करणाऱ्यांमध्ये |
| **अनन्तः** | = अनन्त (शेषनाग) | **अस्मि** | = आहे, | | |
| **च** | = आणि | **पितॄणाम्** | = पितरांमध्ये | **यमः** | = यमराज |
| **यादसाम्** | = जल-जंतूंचा अधिपती | **अर्यमा** | = अर्यमा | **अहम्** | = मी |
| **वरुणः** | = वरुण | **च** | = आणि | **अस्मि** | = आहे. |

* येथे वर्तमान मन्वंतराच्या मनूलाही राजा मानू शकतो.

*व्याख्या*— **अनन्तश्चास्मि नागानाम्**—शेषनाग संपूर्ण नागांचे राजे आहेत*. यांना एक हजार फण्या आहेत. हे नेहमी क्षीर सागरात भगवंताची शय्या होऊन भगवंताना सुख पोहोचवितात. यांनी अनेक वेळा भगवंताबरोबर अवतार घेऊन त्यांच्या लीलेत सहभागी होऊन कार्य केले आहे. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

**वरुणो यादसामहम्**—वरुण संपूर्ण जलजंतूंचे तसेच जल-देवतांचे अधिपती आहेत आणि भगवंताचे भक्त आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

**पितॄणामर्यमा चास्मि**—कव्यवाह, अनल, सोम इत्यादी सात पितृगण आहेत. या सर्वात अर्यमा नावाचे पितर मुख्य आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

**यमः संयमतामहम्**—प्राण्यांवर शासन करणारे राजा इत्यादी जितके अधिकारी आहेत, त्यापैकी यमराज मुख्य आहेत. हे प्राण्यांना त्यांच्या पाप-पुण्याचे फल भोगवून त्यांना शुद्ध करतात. यांचे शासन न्याय आणि धर्मपूर्वक असते. हे भगवंताचे भक्त आणि लोकपालही आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

या विभूतीत जी विलक्षणता दिसून येते ती यांची व्यक्तिगत नसते. ती तर भगवंतापासूनच आलेली असते आणि भगवंताचीच आहे. म्हणून यांचे ठिकाणी भगवंताचेच चिंतन झाले पाहिजे.

**प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम्।**
**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम्॥ ३०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दैत्यानाम्** | = दैत्यांमध्ये | **कालः** | = काळ | **मृगेन्द्रः** | = सिंह |
| **प्रह्लादः** | = प्रह्लाद | **अहम्** | = मी | **च** | = आणि |
| **च** | = आणि | **अस्मि** | = आहे | **पक्षिणाम्** | = पक्ष्यांमध्ये |
| **कलयताम्** | = गणना करणाऱ्यांमध्ये (ज्योतिष्यांमध्ये) | **च** | = आणि | **वैनतेयः** | = गरुड |
| | | **मृगाणाम्** | = पशूंमध्ये | **अहम्** | = मी आहे. |

*व्याख्या*—**प्रल्हादश्चास्मि दैत्यानाम्**—दितीपासून उत्पन्न झालेल्यांना दैत्य म्हणतात. त्या दैत्यांमध्ये प्रल्हाद मुख्य आहेत आणि श्रेष्ठ आहेत. हे भगवंताचे परम विश्वासू आणि निष्काम प्रेमी भक्त आहेत. म्हणून भगवंतांनी त्यांना आपली विभूती म्हटले आहे.

प्रल्हाद तर फार पूर्वी होऊन गेले आहेत, पण भगवंतांनी ''दैत्यात प्रल्हाद मी आहे'' असा वर्तमानकाळी प्रयोग केला आहे. यावरुन असे सिद्ध होते की, भगवंताचे भक्त नित्य राहत असतात आणि श्रद्धा-भक्तिनुसार दर्शनही देत असतात. ते भगवंतात लीन झाल्यावर जर कोणी त्यांचे दर्शन घेण्याची इच्छा केली, तर त्याचे रूप घेऊन भगवान् दर्शन देत असतात.

**कालः कलयतामहम्**—ज्योतिष शास्त्रात काळानेच (समय) आयुष्याची गणना होत असते. म्हणून क्षण, घडी, दिवस, पक्ष, महिना, वर्ष इत्यादी गणना करण्याच्या साधनेत काळ भगवंताची विभूती आहे.

**मृगाणां च मृगेन्द्रोऽहम्**—वाघ, हत्ती, चीत्ता, अस्वल इत्यादी जितके काही पशू आहेत त्या सर्वांत सिंह बलवान, तेजस्वी, प्रभावशाली, शूरवीर आणि साहसी असतो. हा सर्व पशूंचा राजा आहे. म्हणून भगवंतांनी याला आपली विभूती म्हटले आहे.

**वैनतेयश्च पक्षिणाम्**—विनताचे पुत्र गरुडजी संपूर्ण पक्ष्यांचे राजे आहेत आणि भगवंताचे भक्त आहेत. हे भगवान् विष्णूचे वाहन आहेत आणि जेव्हा हे उडत असतात, तेव्हा यांच्या पंखामधून आपोआप सामवेदाच्या ऋचा ध्वनित होतात. म्हणून भगवंतांनी यांना आपली विभूती म्हटले आहे.

या सर्व विभूतीत वेगवेगळ्या रूपाने जी मुख्यता दाखविली गेली आहे, ती तत्त्वतः भगवंताचीच आहे. म्हणून त्यांच्याकडे दृष्टी गेल्याबरोबर आपोआप भगवंताचे चिंतन झाले पाहिजे.

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम्।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी॥ ३१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पवताम्** | = पवित्र करणाऱ्यांमध्ये | **पवनः** | = वायू (आणि) | **रामः** | = राम |
| | | **शस्त्रभृताम्** | = शस्त्रधाऱ्यांमध्ये | **अहम्** | = मी |

* सर्प पृथ्वीवर राहत असतो आणि नाग पाण्यात राहत असतो. हाच सर्प आणि नागात फरक आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अस्मि** | = आहे. | **मकरः** | = मगर | **स्रोतसाम्** | = नद्यांमध्ये |
| **झषाणाम्** | = जल-जंतूंमध्ये | **अस्मि** | = मी आहे | **जाह्नवी** | = गंगाजी |
| | | **च** | = आणि | **अस्मि** | = मी आहे |

*व्याख्या*— **पवनः पवतामस्मि**—वायूपासूनच सर्व वस्तू पवित्र होत असतात. वायूनेच आरोग्य चांगले राहत असते. म्हणून भगवंतांनी पवित्र करणाऱ्यांत वायूला आपली विभूती सांगितली आहे.

**रामः शस्त्रभृतामहम्**—तसे पाहिले तर, राम अवतारी पुरुष आहेत, साक्षात् परमात्मा आहेत, परंतु ज्यावेळी शस्त्र-धाऱ्यांची गणना होत असते त्या सर्वात राम श्रेष्ठ आहेत. म्हणून भगवंतांनी रामांना आपली विभूती म्हटली आहे.

**झषाणां मकरश्चास्मि**—जलचरांमध्ये मगर सर्वात बलवान असते. म्हणून जलचरांमध्ये मगरीला भगवंतांनी आपली विभूती सांगितले आहे.

**स्रोतसामस्मि जाह्नवी**—प्रवाहरूपाने वाहणाऱ्या जितक्या काही नद, नदी, नाले, झरे आहेत त्या सर्वात गंगानदी श्रेष्ठ आहे. हे भगवंताचे खास चरणोदकच आहे. गंगानदी आपल्या दर्शन, स्पर्श इत्यादीने जगाचा उद्धार करणारी आहे. मृत मनुष्याच्या अस्थी गंगेत विसर्जन केल्यास त्याला सद्गती प्राप्त होते. म्हणून भगवंतांनी गंगेला आपली विभूती म्हटले आहे.

वास्तविक या विभूतींची मुख्यता न मानता, भगवंताचीच मुख्यता समजली पाहिजे, कारण या सर्वांत जी विशेषता, महत्ता दिसून येते ती भगवंतापासूनच आलेली असते.

सतराव्या श्लोकात अर्जुनाचे दोन प्रश्न होते. पहिला भगवंताला जाणून घेण्याचा (मी आपणाला कसे जाणून घेऊ) आणि दुसरा जाणण्याच्या उपायांचा (कोणकोणत्या भावात मी आपले चिंतन करू). या दोन्हींसाठी उपाय असा आहे—विभूतीमध्ये भगवंताचे चिंतन करणे आणि त्या चिंतनाचे फल (परिणाम) सर्व विभूतींच्या मूळात भगवंताला तत्त्वाने जाणणे, हे होईल. जसे शस्त्रधाऱ्यांत श्रीरामाला आणि वृष्णीयांत वासुदेवाला (आपल्याला) भगवंतांनी आपली विभूती सांगितले. हे तर त्या समुदायात विभूतिरूपाने श्रीरामाचे आणि वासुदेवाचे चिंतन करण्यासाठी सांगितले आहे. श्रीरामांना आणि वासुदेवांना तत्त्वाने भगवंत जाणणे, हे त्या चिंतनाचे फल राहील. असे चिंतन करणे आणि भगवंताला तत्त्वाने जाणणे सर्व विभूतींच्या विषयात समजले पाहिजे.

संसारात जेथे कोठे ही जी काही विशेषता, विलक्षणता, सुंदरता दिसते तिला वस्तू, व्यक्तीची समजल्याने फसवणूक होत असते, अर्थात् मनुष्य त्या विशेषता इत्यादीला संसाराची मानून त्यात फसतो. म्हणून येथे भगवंतांनी सर्व माणसांसाठी असे सांगितले आहे की, तुम्ही लोकांनी या विशेषता, सुन्दरता इत्यादींना वस्तू, व्यक्तीची मानू नका, तर माझी आणि माझ्यापासून आलेली माना. असे मानून माझे चिंतन कराल, तर तुमचे संसाराचे चिंतन सुटून जाईल आणि त्या जागी मी येईल. याचा परिणाम हा होईल की, तुम्ही मला तत्त्वाने जाणून घ्याल. मला तत्त्वाने जाणून घेतल्यावर माझ्या ठिकाणी तुमची दृढ भक्ती होईल (१०।७)

## सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन।
## अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम्॥ ३२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **अन्तः** | = अंती | **प्रवदताम्** | = परस्परात शास्त्रार्थ करणाऱ्यांमध्ये |
| **सर्गाणाम्** | = संपूर्ण सृष्टींच्या | **अहम्, एव** | = मीच आहे. | | |
| **आदिः** | = आदि, | **विद्यानाम्** | = विद्यांमध्ये | **वादः** | = (तत्त्व-निर्णयासाठी केला जाणारा) वाद |
| **मध्यम्** | = मध्य | **अध्यात्मविद्या** | = अध्यात्म विद्या (ब्रह्मविद्या) | | |
| **च** | = आणि | **च** | = आणि | **अहम्** | = मी आहे. |

*व्याख्या*— **सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहम्**—जितके सर्ग किंवा महासर्ग होत असतात अर्थात् जितक्या प्राण्यांची उत्पत्ती होत असते त्यांच्या आदि, मध्य आणि अंतीही (त्यांच्या लीन झाल्यावरही) मी राहत असतो. तात्पर्य, सर्व काही वासुदेवच आहे. म्हणून संपूर्ण संसाराला, प्राण्यांना पाहताच भगवंताचे स्मरण झाले पाहिजे.

**अध्यात्मविद्या विद्यानाम्**—ज्या विद्येने मनुष्याचे कल्याण होते ती ''अध्यात्मविद्या'' म्हणविली जाते.*

* अध्यात्मविद्या आणि राजविद्या या दोन्हीत फरक आहे. अध्यात्मविद्येत निर्गुण स्वरूपाची मुख्यता असते आणि राजविद्येत सगुण-स्वरूपाची मुख्यता राहत असते. संसाराचा अभाव करून निर्गुण परमात्म्याला जाणून घेणे अध्यात्मविद्या आहे. सर्व देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना इत्यादीत व्यापकरूपाने नित्य-निरंतर राहणाऱ्या सगुण-परमात्म्याला जाणून घेणे, राजविद्या आहे.

दुसऱ्या सांसारिक कितीही विद्या हस्तगत केल्या तरीही शिकणे शिल्लकच राहत असते, परंतु ही अध्यात्मविद्या प्राप्त झाल्यावर शिकणे अर्थात् जाणून घेणे काही बाकी राहत नाही. म्हणून भगवंतांनी या विद्येला आपली विभूती म्हटले आहे.

**वादः प्रवदतामहम्**—आपसात जो शास्त्रार्थ केला जातो, तो तीन प्रकारचा असतो. (१) जल्प—युक्ती-प्रयुक्तीने आपल्या पक्षाचे मंडन आणि दुसऱ्या पक्षाचे खंडन करून आपला पक्ष विजयी आणि दुसरा पक्ष पराजित करणे, या भावनेने जो शास्त्रार्थ केला जातो, त्याला "जल्प" म्हणतात

(२) वितण्डा—आपला कोणताही पक्ष न ठेवता केवळ दुसऱ्या पक्षाचे खंडनच खंडन करण्यासाठी, जो शास्त्रार्थ केला जातो, त्याला "वितण्डा" म्हणतात.

(३) वाद—कोणताही पक्षपात न ठेवता केवळ तत्त्व निर्णयासाठी आपसात जो शास्त्रार्थ (विचार विनिमय) केला जातो त्याला "वाद" म्हणतात.

उपर्युक्त तीन्ही प्रकारच्या शास्त्रार्थात "वाद" श्रेष्ठ आहे. याच वादाला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

**परिशिष्ट भाव**—लौकिक विद्यांमध्ये 'अध्यात्मविद्या' अर्थात् आत्मज्ञान श्रेष्ठ आहे. यालाच गीतेच्या अध्यायांच्या पुष्पिकेमध्ये 'ब्रह्मविद्या' म्हटले गेले आहे.

अध्यात्मविद्या अर्थात् आत्मज्ञान ह्याला विभूती सांगण्याचे कारण हे आहे की, हे सर्वापेक्षा सरळ आहे, सर्वापेक्षा सुगम आहे आणि सर्वांच्या प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे. हे करण्यात, समजण्यात आणि प्राप्त करण्यात कोणते काठिण्य नाहीच. यात करणे, समजणे आणि प्राप्त करणे लागू होतच नाही. कारण हे नित्य प्राप्त आहे आणि जागृती स्वप्न, सुषुप्ती इत्यादी संपूर्ण अवस्थांमध्ये सदा जसेच्या तसे विराजमान आहे. आत्मज्ञान जितके प्रत्यक्ष आहे तितका प्रत्यक्ष हा संसारही नाही. तात्पर्य, आपल्या अनुभवात आत्मज्ञान जितके स्पष्ट येते तितका स्पष्ट संसार येत नाही. ही गोष्ट अशाप्रकारे समजून घ्यावी. आपण आपल्या बालकपणाला आठवावे आणि वर्तमान अवस्थेला पहावे तर शरीर ते राहिले नाही, सवय ती राहिली नाही, भाषा ती राहिली नाही, व्यवहार तो राहिला नाही, स्थान ते राहिले नाही, समय तो राहिला नाही, साथीदार ते राहिले नाहीत, क्रिया त्या राहिल्या नाहीत, विचार ते राहिले नाहीत, सर्व काही बदलून गेले, परंतु सत्तारूपाने आपण स्वतः बदललो नाही. म्हणूनच तर आपण म्हणतो की, 'मी तर तोच आहे, जो बालकपणी होतो'. तात्पर्य हे झाले की, जे बदलून गेले ते वेगळ्या स्वभावाचे आहे आणि जे बदलले नाही ते वेगळ्या स्वभावाचे आहे. जे बदलले नाही ते आपले खरे वास्तविक स्वरूप अर्थात् शरीरी आहे आणि जे बदलले ते शरीर आहे. हे आत्मज्ञान आहे.

## अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च।
## अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अक्षराणाम्** | = अक्षरांमध्ये | **अहम्** | = मी | **विश्वतोमुखः** | = सर्व बाजूंनी मुख असणारा |
| **अकारः** | = अकार | **अस्मि** | = आहे | **धाता** | = धाता (सर्वांचे पालन पोषन करणाराही) |
| **च** | = आणि | **अक्षयः, कालः** | = अक्षयकाळ अर्थात् काळाचाही महाकाळ (आणि) | **अहम, एव** | = मीच आहे. |
| **सामासिकस्य** | = समासांमध्ये | | | | |
| **द्वन्द्वः** | = द्वन्द्व समास | | | | |

***व्याख्या*— अक्षराणामकारोऽस्मि**—वर्णमालेत सर्व प्रथम अकार येतो. स्वर आणि व्यंजन—दोन्हीत अकार मुख्य आहे. अकाराविना व्यंजनाचा उच्चार होत नाही. म्हणून भगवंतांनी अकाराला आपली विभूती म्हटले आहे.

**द्वन्द्वः सामासिकस्य च**—दोन किंवा अधिक शब्द मिळून जो एक शब्द बनतो, त्याला समास म्हणतात. समास पुष्कळ प्रकारचे असतात. त्यात अव्ययीभाव, तत्पुरुष, बहुव्रीही आणि द्वन्द्व—हे चार मुख्य आहेत. दोन शब्दाच्या समासामध्ये जर पहिला शब्द मुख्य असेल तर तो "अव्ययी-भाव" समास होतो. जर शेवटचा शब्द प्रधान असेल तर तो "तत्पुरुष" समास होतो. जर दोन्ही शब्द तीसऱ्याचे वाचक असतील तर तो "बहुव्रीही" समास होतो. जर दोन्ही शब्द मुख्य असतील तर तो "द्वन्द्व" समास होत असतो.

द्वन्द्व समासात दोन्ही शब्दाचे अर्थ मुख्य असल्याने, भगवंतांनी याला आपली विभूती म्हटले आहे.

**अहमेवाक्षयः कालः**—ज्या काळाचा कधीही क्षय होत नाही, अर्थात् जो काळातीत आहे आणि अनादी-अनंत-रूप आहे तो काळ भगवान्च आहेत.

सर्ग आणि प्रलयाची गणना सूर्यापासून होत असते; परंतु जेव्हा महाप्रलयात सूर्यही लीन होत असतो, तेव्हा

वेळेची गणना परमात्म्यापासून होते *म्हणून परमात्मा अक्षयकाळ आहेत.

तीसाव्या श्लोकात "**कालः कलयतामहम्**" पदांत आलेल्या "काळ" यात आणि येथे आलेल्या अक्षयकाळात काय फरक आहे? तेथील जो "काळ" आहे तो एक क्षणभरही स्थिर राहत नाही, बदलत राहतो. तो काळ ज्योतिष-शास्त्राचा आधार आहे आणि त्यापासूनच संपूर्ण संसाराची गणना होत असते. परंतु येथील जो अक्षयकाळ आहे, तो परमात्मस्वरूपच असल्याने कधी बदलत नाही. तो अक्षय-काळ सर्वांना खाऊन टाकतो आणि स्वतः जसाच्या तसा राहतो. अर्थात् त्याच्यात कधी कोणताही विकार होत नाही. त्याच अक्षयकाळास येथे भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे. पुढे अकराव्या अध्यायातही भगवंतांनी "**कालोऽस्मि**" (११।३२) पदाने अक्षयकाळाला आपले स्वरूप म्हटले आहे.

**धाताहं विश्वतोमुखः**—सर्व बाजूंनी मुख असल्याने भगवंताची दृष्टी सर्व प्राण्यांवर राहत असते. म्हणून सर्वांचे धारण-पोषण करण्यात भगवान् खूप सावधान राहतात. कोणत्या प्राण्याला कोणती वस्तू केव्हा मिळाली पाहिजे, याची आठवण भगवान् खूप ठेवतात आणि योग्य समयी ती वस्तू त्याला मिळेल अशी व्यवस्था करतात. म्हणून भगवंताने आपले विभूतिरूपात वर्णन केले आहे.

## मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम्।
## कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा॥ ३४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वहरः** | = सर्वांचे हरण करणारा | **अहम्** | = मी आहे | **स्मृतिः** | = स्मृती, |
| **मृत्युः** | = मृत्यू | **च** | = आणि | **मेधा** | = मेधा, |
| **च** | = आणि | **नारीणाम्** | = स्त्री-जातींमध्ये | **धृतिः** | = धृती |
| **भविष्यताम्** | = भविष्यात | **कीर्तिः** | = कीर्ती, | **च** | = आणि |
| **उद्भव** | = उत्पन्न होणारा | **श्रीः** | = श्री, | **क्षमा** | = क्षमा (मी आहे) |
| | | **वाक्** | = वाक् (वाणी), | | |

*व्याख्या*—**मृत्युः सर्वहरश्चाहम्**—मृत्यूमध्ये हरण करण्याची अशी विलक्षण शक्ती आहे की, मृत्यूनंतर येथील आठवण सुद्धा राहत नाही. सर्व काही हरण केले जाते. वास्तविक हे सामर्थ्य मृत्यूचे नव्हे, तर परमात्म्याचेच आहे.

जर संपूर्णपणे हरण करण्याचे, विस्मृती करण्याचे, भगवत्प्रदत्त सामर्थ्य मृत्यूत नसते तर आत्मीयतेच्या संबंधाने जशी चिंता मनुष्याला या जन्मात असते, तशीच चिंता मागील जन्मासंबंधीही राहिली असती. मनुष्याने न जाणो किती जन्म घेतले असतील. जर त्या जन्मांची आठवण राहिली असती, तर मनुष्याच्या चिंतेचा, मोहाचा कधी अंतच लागला नसता. परंतु, मृत्यूद्वारा विस्मृती झाल्याने पूर्वजन्माचे कुटुंब, संपत्ती इत्यादीची चिंता राहत नाही. अशा प्रकारे मृत्यूमध्ये चिंता, मोह समाप्त करण्याचे जे सामर्थ्य आहे, ते सर्व भगवंताचेच आहे.

**उद्भवश्च भविष्यताम्**—जसे पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, सर्वांचे धारण-पोषण करणारा मीच आहे; तसेच या ठिकाणी सांगतात की, सर्व उत्पन्न होणाऱ्या उत्पत्तीचा हेतु मीच आहे. तात्पर्य, संसाराची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय करणारा मीच आहे.

**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा**—कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा, धृति आणि क्षमा—या सातही, संपूर्ण संसारातील स्त्रीयात श्रेष्ठ मानल्या गेल्या आहेत. यापैकी कीर्ति, स्मृति, मेधा, धृति आणि क्षमा ह्या पाच दक्ष प्रजापती यांच्या कन्या आहेत, "श्री" महर्षी भृगुची कन्या आहे आणि "वाक्" ब्रह्मदेवाची कन्या आहे.

कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा, धृति आणि क्षमा हे सातही स्त्रीवाचक नावाचे गुण देखील संसारात प्रसिद्ध आहेत. सद्गुणांना अनुसरून संसारात जी प्रसिद्धी असते, प्रतिष्ठा असते, तिला "कीर्ती" म्हणतात.

स्थावर आणि जंगम असे दोन प्रकारचे ऐश्वर्य असते. जमीन, घर, धन, संपत्ती इत्यादी स्थावर ऐश्वर्य आहे आणि गाय, म्हैस, घोडा, उंट, हत्ती, इत्यादी जंगम ऐश्वर्य आहे. या दोन्ही ऐश्वर्यांना "श्री" म्हणतात.

ज्या वाणीला धारण केल्याने संसारात यश, प्रतिष्ठा होत

* महाप्रलयात ब्रह्मदेव लीन होतात. महासर्गाचा अर्थात् ब्रह्मदेवाच्या आयुष्याचा जितका काळ असतो, तितकाच काळ महाप्रयलाचा असतो. म्हणून एवढ्या दीर्घ (महाप्रलय) काळाची गणना अक्षयकाळरूपी परमात्म्यापासूनच होत असते.

असते आणि जिच्यामुळे मनुष्य पण्डित, विद्वान् म्हणविला जातो, तिला "वाक्" म्हणतात.

मागील ऐकलेल्या-समजलेल्या गोष्टींची आठवण येण्याला "स्मृती" म्हणतात.

बुद्धीची जी स्थायीरूपाने धारण करण्याची शक्ती असते, अर्थात् ज्या शक्तीने विद्या योग्य रीतीने स्मरणात राहते, त्या शक्तीचे नाव "मेधा" आहे.

मनुष्याला आपला सिद्धांत, मान्यता इत्यादीवर अटळ ठेवणे व त्यापासून विचलित होऊ न देणाऱ्या शक्तीला "धृती" म्हणतात.

दुसरा कोणी विनाकारण आपला अपराध केला तरी आपल्यात शिक्षा करण्याची शक्ती असूनही त्याला शिक्षा न करणे आणि त्याला इह-परलोकी कुठेही त्या अपराधाची शिक्षा मिळू नये—अशा प्रकारचा भाव ठेवून त्याला माफ करणे "क्षमा" आहे.

कीर्ती, श्री आणि वाक् ह्या तीन, प्राण्यांच्या बाहेर प्रगट होणाऱ्या विशेषता आहेत तसेच स्मृती, मेधा, धृती आणि क्षमा या चार, प्राण्यांच्या अंतःकरणात प्रगट होणाऱ्या विशेषता आहेत. या सातही विशेषतांना भगवंतांनी आपली विभूती सांगितली आहे.

या ठिकाणी ज्या विशेष गुणांना विभूतीरूपाने म्हटले आहे. याचे तात्पर्य, केवळ भगवंताकडे लक्ष करविण्याकडे आहे. एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणी हे गुण दिसले, तर त्या व्यक्तीची विशेषता न मानता, भगवंताचीच विशेषता मानली पाहिजे आणि भगवंताचेच स्मरण झाले पाहिजे. हे जर गुण आपल्या ठिकाणी दिसले, तर यांना भगवंताचेच मानले पाहिजे, आपले नव्हे. कारण ही दैवी (भगवंताची) संपत्ती आहे जी भगवंतापासूनच प्रगट झाली आहे. या गुणांना आपले समजल्याने आपल्या ठिकाणी अभिमान निर्माण होतो, ज्यामुळे पतन होत असते कारण अभिमान संपूर्ण आसुरी संपत्तीचा जनक आहे.

साधकांना ज्या कोणात जी काही विशेषता, सामर्थ्य दिसून आले तर त्याला त्या वस्तू, व्यक्तीचे न मानता भगवंताचेच मानले पाहिजे. जसे लोमश ऋषींच्या शापाने, काकभुशुण्डी ब्राह्मणाचे चाण्डाल पक्षी बनले, परंतु त्यांना कसलीही भिती वाटली नाही, त्यांचे ठिकाणी कोणत्याही प्रकारची दीनता आली नाही आणि कोणता विचारही मनात आला नाही, उलट त्यांना प्रसन्नताच झाली. कारण त्यांनी यात ऋषींचा दोष न मानता भगवंताची प्रेरणाच समजली—**सुनु खगेस नहिं कछु रिषि दूषन। उर प्रेरक रघुबंस बिभूषन॥** (मानस ७।११३।१) त्याचप्रमाणे मनुष्य जर सर्व वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीच्या मूळात भगवंताला पाहू लागेल, तर त्याला निरंतर आनंदच आनंद प्राप्त होईल.

## बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम्।
## मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः॥ ३५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **साम्नाम्** | = गायल्या जाणाऱ्या श्रुतींमध्ये | **छन्दसाम्** | = सर्व छन्दांमध्ये | **मार्गशीर्षः** | = मार्गशीर्ष (आणि) |
| | | **गायत्री** | = गायत्री छन्द | **ऋतूनाम्** | = सहाऋतूंमध्ये |
| **बृहत्साम** | = बृहत्साम | **अहम्** | = मी आहे. | **कुसुमाकरः** | = वसंतऋतू |
| **तथा** | = आणि | **मासानाम्** | = बारा महिन्यांमध्ये | **अहम्** | = मी आहे. |

*व्याख्या*—**बृहत्साम तथा साम्नाम्**—सामवेदांत बृहत्साम नावाची एक गीती आहे. त्यांत इंद्ररूपी परमेश्वराची स्तुती केली गेली आहे. अतिरात्र यज्ञांमध्ये हे एक पृष्ठस्तोत्र आहे. सामवेदामध्ये सर्वात श्रेष्ठ असल्याने या बृहत्सामाला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.*

**गायत्री छन्दसामहम्**—वेदांच्या जितक्या ऋचा छन्दोबद्ध आहेत, त्यात गायत्रीची मुख्यता आहे. गायत्रीला वेदजननी म्हणतात, कारण हिच्यापासूनच वेद प्रगट झाले आहेत. स्मृती आणि शास्त्र ग्रथांमध्ये गायत्रीचे फार वर्णन केले गेले आहे. गायत्रीमध्ये स्वरूप, प्रार्थना आणि ध्यान—तिन्ही परमात्म्याचेच असल्याने तिच्या उपासनेने परमात्म-तत्त्वाची प्राप्ती होते. म्हणून भगवंतांनी गायत्रीला आपली विभूती म्हटले आहे.

**मासानां मार्गशीर्षोऽहम्**—ज्या अन्नाने संपूर्ण प्रजा जीवित राहते त्या (पावसाने होणाऱ्या) अन्नाची उत्पत्ती मार्गशीर्ष महिन्यात होत असते. या महिन्यात नवीन अन्नाने

* या दहाव्या अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात भगवंतांनी वेदांत "सामवेदा" ला आपली विभूती म्हटले आहे आणि येथे (पस्तीसाव्या श्लोकात) भगवंतांनी सामवेदातही "बृहत्साम" ला आपली विभूती म्हटले आहे.

यज्ञही केला जातो. महाभारत काळात नवीन वर्ष मार्गशीर्ष महिन्यापासूनच आरंभ होत होते. या विशेषतेमुळे भगवंतांनी मार्गशीर्ष महिन्याला आपली विभूती म्हटले आहे.

**ऋतूनां कुसुमाकरः**—वसंतऋतूमध्ये पाण्याशिवाय, वृक्ष, लता इत्यादी पत्र-पुष्पांनी युक्त होत असतात. या ऋतूमध्ये उष्णताही जास्त नसते आणि थंडीही जास्त नसते. म्हणून भगवंतांनी वसंत ऋतूला आपली विभूती म्हटले आहे.

या सर्व विभूतींमध्ये जी महत्ता, विशेषता दिसून येते, ती केवळ भगवंताचीच असते. म्हणून चिंतन केवळ भगवंताचेच केले पाहिजे.

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम्॥ ३६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **छलयताम्** | = छल करणाऱ्यांमध्ये | **अस्मि** | = आहे | **सत्त्ववताम्** | = (आणि) सात्त्विक मनुष्यांचा |
| **द्यूतम्** | = द्यूत (आणि) | **जयः** | = (जिंकणाऱ्यांचा) विजय | **सत्त्वम्** | = सात्त्विकभाव |
| **तेजस्विनाम्** | = तेजस्वीमध्ये | **अस्मि** | = मी आहे. | **अहम्** | = मी |
| **तेजः** | = तेज | **व्यवसायः** | = (निश्चय करणाऱ्यांचा) निश्चय | **अस्मि** | = आहे. |
| **अहम्** | = मी | | | | |

***व्याख्या*—द्यूतं छलयतामस्मि**—कपट करून दुसऱ्यांचे राज्य, वैभव, धन, संपत्ती इत्यादींचे (सर्वस्वाचे) अपहरण करण्याचे विशेष सामर्थ्य असलेली जी विद्या असते तिला "द्यूत" म्हणतात. या "द्यूता" ला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

**शंका**—येथे जर भगवंतांनी कपट करणाऱ्यात द्यूताला आपली विभूती म्हटले आहे तर, द्यूत खेळण्यात काय दोष आहे? जर दोष नाही तर मग शास्त्रामध्ये याचा निषेध का केला गेला आहे?

**समाधान**—"असे करा आणि कसे करू नका" हा शास्त्राचा विधिनिषेध म्हटला जातो. अशा विधिनिषेधाचे वर्णन येथे नाही. येथे तर विभूतींचे वर्णन आहे. "मी आपले चिंतन कुठे कुठे करू?" अर्जुनाच्या या प्रश्नानुसार, भगवंतांनी विभूतींच्या रूपात आपल्या चिंतनाची गोष्ट सांगितली, अर्थात् भगवंताचे चिंतन सुलभतेने व्हावे यासाठी विभूतींच्या रूपात उपाय सांगितला. म्हणून ज्या समुदायात मनुष्य राहतो, त्या समुदायात दृष्टी पडेल, त्या ठिकाणी संसाराला न पाहता भगवंतालाच पहावे कारण भगवान् म्हणतात, हे संपूर्ण जग माझ्याने व्यापलेले आहे, अर्थात् या जगात मीच व्यापून आहे, परिपूर्ण आहे (९।४)

जसे एखाद्या साधकाला पूर्वी द्यूत खेळण्याचे व्यसन लागलेले असेल आणि आता तो भगवद्भक्ती करत असेल. त्याला जर कधी द्यूताचे स्मरण झाले, तर त्याने द्यूताचे चिंतन सोडून देण्यासाठी त्यावेळी भगवंताचे चिंतन करावे की, या खेळात हार-जीतची विशेषता आहे, ती भगवंताची आहे. अशाप्रकारे द्यूतात भगवंताचे चिंतन झाल्यास द्यूताविषयीचे चिंतन आपोआप समाप्त होईल आणि भगवंताचे चिंतन होऊ लागेल. त्याचप्रमाणे दुसऱ्याला द्यूत खेळत असलेले पाहिले आणि त्यात हार-जीतला पाहिले तर, हरविण्याची आणि जिंकविण्याची शक्ती ही द्यूताची न मानता भगवंताचीच मानावी. कारण खेळ तर समाप्त होत असतो आणि होईल. परंतु परमात्मा त्यात निरंतर राहतात आणि राहतील. अशाप्रकारे द्यूत इत्यादीला विभूती म्हणण्याचे तात्पर्य भगवंताच्या चिंतनात आहे.*

जीव स्वतः साक्षात् परमात्म्याचा अंश आहे परंतु याने अज्ञानाने असत् शरीर-संसाराशी आपला संबंध मानून घेतला आहे. जर ही संसारात दिसणारी महत्ता, विशेषता, शोभा, इत्यादीला परमात्म्याचीच मानून परमात्म्याचे चिंतन जीवाने केले, तर तो परमात्म्याकडे वळेल अर्थात् त्याचा उद्धार होईल (८।१४) आणि जर महत्ता, विशेषता, शोभा इत्यादींना संसाराची मानून संसाराचे चिंतन जीवाने केले तर तो संसाराकडे वळेल अर्थात् त्याचे पतन होईल. (२।६२-६३) म्हणून परमात्म्याचे चिंतन करत, परमात्म्याला तत्त्वाने जाणून घेण्याच्या उद्देशानेच, या विभूतींचे वर्णन केले गेले आहे.

**तेजस्तेजस्विनामहम्**—†महापुरुषांच्या त्या दैवी संपत्ती असणाऱ्या प्रभावाचे नाव तेज आहे, ज्यांच्यासमोर पापी मनुष्यदेखील पाप करण्याचे धाडस करत नाहीत. या तेजाला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

**जयोऽस्मि**—विजय सर्व प्राण्यांना प्रिय असतो.

* एखाद्या ग्रंथाच्या एखाद्या अंशावर शंका असेल तर त्या ग्रंथाच्या आरंभापासून शेवटपर्यंत अध्ययन करून त्यातील वक्त्याच्या उद्देशाला, लक्ष्याला, आणि आशयाला समजून घेतल्याने, त्या शंकेचे समाधान होत असते.

† सातव्या अध्यायात जेथे भगवंतांनी कारणरूपाने विभूतींचे वर्णन केले आहे तेथेही हेच पद आले आहे "तेजस्तेजस्विनामहम्" (७।१०)

विजयाची ही विशेषता भगवंताची आहे. म्हणून भगवंतांनी विजयाला आपली विभूती म्हटले आहे.

आपल्या इच्छेनुसार आपला विजय झाल्याने जे सुख होत असते, त्याचा उपभोग न करता त्यांत भगवद्‌बुद्धी केली पाहिजे की, विजयरूपाने भगवंत आले आहेत.

**व्यवसायोऽस्मि**—व्यवसाय एका निश्चयाला म्हणतात. अशा एक निश्चयाचे माहात्म्य भगवंतांनी गीतेमध्ये फार वर्णन केले आहे. जसे कर्मयोग्याची निश्चयात्मिका बुद्धी एक असते (२।४१). भोग आणि ऐश्वर्यात आसक्त असलेल्या पुरुषाची निश्चयात्मिका बुद्धी नसते (२।४४). "आता तर मी केवळ भगवंताचे भजनच करेल" या एका निश्चयाच्या बळावर दुराचाराती दुराचारी मनुष्यालाही भगवान् साधू म्हणतात. (९।३०) अशाप्रकारे भगवद्‌भक्तीचा जो निश्चय असतो त्याला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

निश्चयाला आपली विभूती म्हणण्याचे तात्पर्य, साधकाने तर असा निश्चय ठेवलाच पाहिजे; परंतु त्याला आपला गुण मानू नये, तर असे समजावे की, ही भगवंताची विभूती आहे आणि त्यांच्याच कृपेने मला प्राप्त झाला आहे.

**सत्त्वं सत्त्ववतामहम्**—सात्त्विक मनुष्यात जो सत्त्वगुण आहे, जो सात्त्विकभाव आणि आचरण आहे, तीही भगवंताची विभूती आहे. तात्पर्य रजोगुण आणि तमोगुणाला दाबून जो सात्त्विकभाव वाढतो त्या सात्त्विकभावाला साधकाने आपला गुण न मानता भगवंताची विभूती समजावी.

तेज, व्यवसाय, सात्त्विकभाव इत्यादी आपल्यात अथवा दुसऱ्यात पाहण्यात आले तर, साधकाने त्यांना आपले अथवा एखाद्या वस्तू-व्यक्तीचे गुण मानू नये, तर भगवंताचेच गुण समजावे. त्या गुणांकडे दृष्टी गेल्यास त्यात तत्त्वाने भगवंताना पाहून भगवंताचेच स्मरण झाले पाहिजे.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनञ्जयः।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः॥ ३७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वृष्णीनाम्** | = वृष्णिवंशियांमध्ये | **धनञ्जयः** | = अर्जुन | **कवीनाम्** | = कवींमध्ये |
| **वासुदेवः** | = वसुदेव पुत्र श्रीकृष्ण (आणि) | **अस्मि** | = मी आहे | **उशना, कविः,** | = शुक्राचार्य |
| | | **मुनीनाम्** | = मुनींमध्ये | **अपि** | कवीही |
| **पाण्डवानाम्** | = पांडवांमध्ये | **व्यासः** | = वेदव्यास (आणि) | **अहम्** | = मी आहे. |

*व्याख्या*— **वृष्णीनां वासुदेवोऽस्मि**—येथे भगवान् श्रीकृष्णाच्या अवताराचे वर्णन नाही तर वृष्णीवंशीयामध्ये आपली जी विशेषता आहे, त्या विशेषतेच्या अनुषंगाने भगवंतांनी आपले विभूतीरूपाने वर्णन केले आहे.

येथे भगवंताचे आपणाला विभूतीरूपाने सांगणे हे तर संसाराच्या दृष्टीने आहे, स्वरूपाच्या दृष्टीने तर ते साक्षात् भगवान्‌च आहेत. या अध्यायात जितक्या विभूती आल्या आहेत, त्या सर्व संसाराच्या दृष्टीनेच आहेत. तत्त्वाने तर त्या परमात्मस्वरूपच आहेत.

**पाण्डवानां धनञ्जयः**—पांडवांत अर्जुनाची जी विशेषता आहे, ती विशेषता भगवंताचीच आहे. म्हणून भगवंतांनी अर्जुनाला आपली विभूती म्हटले आहे.

**मुनीनामप्यहं व्यासः**—वेदाचे चार भाग, पुराणे, उप-पुराणे, महाभारत इत्यादीत जे काही संस्कृत वाङ्‌मय आहे ते सर्वचे सर्व व्यासकृपेचे फल आहे. आजही एखाद्याने नवीन रचना केली तर त्यालाही व्यासांचेच उच्छिष्ट मानले जाते. म्हटलेही आहे-"**व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्**". अशा रीतीने सर्व मुनींमध्ये व्यासजी मुख्य आहेत. म्हणून भगवंतांनी व्यासांना आपली विभूती म्हटले आहे. तात्पर्य व्यासांमध्ये विशेषता दिसताच भगवंताचे स्मरण झाले पाहिजे की, ही सर्व विशेषता भगवंताची आहे आणि त्यांच्यापासूनच आली आहे.

**कवीनामुशना कविः**—शास्त्रीय सिद्धांतांना योग्य रीतीने जाणणारे जितके काही पंडित आहेत, ते सर्व "कवि" म्हटले जातात. त्या सर्व कवींमध्ये शुक्राचार्य मुख्य आहेत. शुक्राचार्य संजीवनी विद्येचे ज्ञाते आहेत. यांची शुक्रनीती प्रसिद्ध आहे. अशाप्रकारे अनेक गुणांमुळे भगवंतांनी यांना आपली विभूती म्हटले आहे.

या विभूतींची महत्ता पाहून कुठे जर बुद्धी अडकली तर, त्यावेळी त्या महत्तेला भगवंताचीच समजली पाहिजे; कारण ती महत्ता, एक क्षणभरही स्थायीरूपाने न राहणाऱ्या संसाराची होऊ शकत नाही.

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम्॥ ३८॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **दमयताम्** | = दमन करणाऱ्यांमध्ये | **अस्मि** | = मी आहे. | **च** | = आणि |
| **दण्डः** | = दंडनीती (आणि) | **गुह्यानाम्** | = गोपनीय भावांमधील | **ज्ञानवताम्** | = ज्ञानवानांमध्ये |
| **जिगीषताम्** | = विजयाच्या इच्छुकांमध्ये | **मौनम्** | = मौन | **ज्ञानम्** | = ज्ञान |
| | | | | **अहम्, एव** | = मीच |
| **नीतिः** | = नीती | **अस्मि** | = मी आहे | **अस्मि** | = आहे |

*व्याख्या*— **दण्डो दमयतामस्मि**—दुष्टांना दुष्टतेपासून काढून सन्मार्गावर आणण्यासाठी दंडनीती मुख्य आहे. म्हणून भगवंताने हिला आपली विभूती म्हटले आहे.

**नीतिरस्मिजिगीषताम्**—नीतीचा आश्रय घेतल्यानेच मनुष्य विजय प्राप्त करत असतो. नीतीने मिळणारा विजयच खरा ठरत असतो. म्हणून नीतीला भगवंतांनी आपली विभूती म्हटले आहे.

**मौनं चैवास्मि गुह्यानाम्**—गुप्त ठेवण्यालायक जितके भाव आहेत, त्या सर्वात मौन (वाणीचा संयम अर्थात् चुप राहणे) मुख्य आहे; कारण मौन असणाराच्या भावांना प्रत्येक व्यक्ती जाणू शकत नाही. म्हणून गोपनीय भावात भगवंतांनी मौनाला आपली विभूती म्हटले आहे.

**ज्ञानं ज्ञानवतामहम्**—संसारात कला-कौशल्य इत्यादींना जाणणाऱ्यात जे ज्ञान (माहीती) आहे, ती भगवंताची विभूती आहे, येथे सामान्य शास्त्रज्ञानापासून तत्त्वज्ञानापर्यंत सर्वचे सर्व ज्ञान **'ज्ञानं ज्ञानवतामहम्'** च्या अंतर्गत घेऊ शकता. तात्पर्य, असे ज्ञान आपल्यात किंवा दुसऱ्यात दिसून आले तर ती भगवंताची विभूतीच समजावी.

या सर्व विभूतींत जी विलक्षणता आहे ती यांची व्यक्तिगत नाही तर, परमात्म्याचीच आहे. म्हणून परमात्म्या-कडेच दृष्टी गेली पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—येथे सामान्य शास्त्रज्ञानापासून तत्त्वज्ञानापर्यंत सर्वचे सर्व ज्ञान 'ज्ञानं ज्ञानवतामहम्' च्या अंतर्गत घेऊ शकतो.

## यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन।
## न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्*॥ ३९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **च** | = आणि | **तत्, अपि** | = ते बीजही | **न, अस्ति** | = नाही, |
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **अहम्** | = मीच आहे; (कारण) | **यत्** | = जो |
| **सर्वभूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांचे | **तत्** | = असा | **मया, विना** | = माझ्याशिवाय |
| **यत्** | = जे | **चराचरम्** | = चर-अचर (कोणता) | **स्यात्** | = असू शकेल अर्थात् चर-अचर सर्व काही मीच आहे. |
| **बीजम्** | = बीज (मूळ कारण) आहे, | **भूतम्** | = प्राणी | | |

*व्याख्या*— **यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन**—येथे भगवान् संपूर्ण विभूतींचे तात्पर्य सांगत आहेत की, सर्वांचे बीज अर्थात् कारण मीच आहे. बीज म्हणण्याचे तात्पर्य, या संसाराचा निमित्तकारणही मीच आहे आणि उपादानकारणही मीच आहे; अर्थात् संसाराला निर्माण करणारा मीच आहे आणि संसाररूपाने बनणाराही मीच आहे.

भगवंतांनी सातव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकात आपल्याला "सनातन बीज"; नवव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात "अव्यय बीज"; आणि येथे केवळ "बीज" म्हटले आहे. याचे तात्पर्य, मी जसाच्या तसा राहत असून-ही संसाररूपाने प्रगट होत असतो आणि संसाररूपाने प्रगट होऊनही मी त्यात जसाच्या तसा व्यापक राहत असतो.

**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्**—संसारात जड-चेतन, स्थावर-जंगम, चर-अचर इत्यादी जे काहीही दिसून येते, ते सर्व माझ्याशिवाय असू शकत नाही. सर्व माझ्यापासूनच उत्पन्न होतात, अर्थात् सर्व काही मीच मी आहे. या वास्तविक मूळ तत्त्वाला जाणून घेऊन साधकाची मन, बुद्धी, इंद्रिये कोठे जातील; अथवा

---

* भगवंतांनी वीसाव्या श्लोकापासून एकोणचाळीसाव्या श्लोकापर्यंत आपल्या एकूण ब्यांशी विभूतींचे वर्णन केले आहे. जसे वीसाव्या श्लोकात चार, एकवीसाव्या श्लोकात चार, बावीसाव्या श्लोकात चार, तेवीसाव्या श्लोकात चार, चोवीसाव्या श्लोकात तीन, पंचवीसाव्या श्लोकात चार, सव्वीसाव्या श्लोकात चार, सत्तावीसाव्या श्लोकात तीन, अठ्ठावीसाव्या श्लोकात चार, एकोणतीसाव्या श्लोकात चार, तीसाव्या श्लोकात चार, एकतीसाव्या श्लोकात चार, बत्तीसाव्या श्लोकात पाच, तेहतीसाव्या श्लोकात चार, चौतीसाव्या श्लोकात नऊ, पस्तीसाव्या श्लोकात चार, छत्तीसाव्या श्लोकात पाच, सदतीसाव्या श्लोकात चार, अडतीसाव्या श्लोकात चार आणि एकोणचाळीसाव्या श्लोकात एका विभूतीचे वर्णन केले आहे.

मनबुद्धीत संसाराची जी काही गोष्ट आठवेल त्या सर्वांना भगवंताचेच स्वरूप मानावे. असे मानल्याने साधकाचे भगवंताविषयीच चिंतन होईल, दुसऱ्याचे नव्हे, कारण तत्त्वत: भगवंताशिवाय दुसरे काहीच नाही.

येथे भगवंतांनी म्हटले आहे की, माझ्याशिवाय चर-अचर काहीही नाही; अर्थात् सर्व काही मीच मी आहे आणि अठराव्या अध्यायात चाळीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांशिवाय काहीही नाही, सर्व गुणांचेच कार्य आहे. या फरकाचे तात्पर्य, येथे भक्तियोगाचे प्रकरण आहे. या प्रकरणात अर्जुनाने प्रश्न केला आहे की, मी आपले कोठे कोठे चिंतन करू? म्हणून उत्तरात भगवान् म्हणतात की, तुझ्या मनात ज्याचे ज्याचे चिंतन होईल ते सर्व मीच आहे. परंतु तेथे (१८।४० मध्ये) सांख्ययोगाचे प्रकरण आहे. सांख्ययोगात प्रकृती आणि पुरुष दोघांच्या विवेकाची तसेच प्रकृतीशी संबंध-विच्छेद करण्याची मुख्यता असते. प्रकृतीचे कार्य असल्याने संपूर्ण सृष्टी त्रिगुणमयी आहे.* म्हणून तेथे तिन्ही गुणांपासून रहित कोणीही नाही असे म्हटले गेले आहे.

**विशेष गोष्ट**

भगवंतांनी "**अहमात्मा गुडाकेश**" (१०।२०) पासून "**बीजं तदहमर्जुन**" (१०।३९) पर्यंत ज्या ब्यांशी विभूती सांगितल्या आहेत त्याचे तात्पर्य, लहान-मोठे, उत्तम, मध्यम, अधम सांगण्यात नाही; तर कोणतीही वस्तू, व्यक्ती, घटना परिस्थिती इत्यादी समोर आली तरी, त्यात भगवंताचेच चिंतन झाले पाहिजे. †कारण मूळात अर्जुनाचा प्रश्न हाच होता की, आपले चिंतन करत मी आपणाला कसे जाणून घेऊ आणि कोण्या कोण्या भावात मी आपले चिंतन करू? (१०।१७) त्या प्रश्नाच्या उत्तरात चिंतन करण्यासाठी भगवंतांनी आपल्या विभूतींचे संक्षिप्त वर्णन केले आहे.

जसे येथे गीतेत भगवंतांनी अर्जुनाला आपल्या विभूती सांगितल्या, तसेच श्रीमद्भागवतात (अकराव्या स्कंधाच्या सोळाव्या अध्यायात) भगवंतांनी उद्धवजीना आपल्या विभूती सांगितल्या आहेत. गीतेत सांगितलेल्या काही विभूती भागवतात आल्या नाहीत आणि भागवतात सांगितलेल्या काही विभूती गीतेत आल्या नाहीत. गीता आणि भागवतात सांगितलेल्या काही विभूतीत साम्य आहे परंतु काही विभूती-संबंधी दोन्ही ठिकाणी वेगवेगळा विषय आलेला आहे. जसे गीतेत पुरोहितात बृहस्पतीला आपली विभूती सांगितली "**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्**" (१०।२४) आणि भागवतात भगवंतांनी पुरोहितात वसिष्ठजींना आपली विभूती म्हटले आहे. "**पुरोधसां वसिष्ठोऽहम्**" (श्रीमद्भा० ११।१६।२२) आता शंका अशी येते की, गीता आणि भागवताचा वक्ता एक असूनही, दोघात एका विषयाचे साम्य का नसावे? याचे समाधान, असे आहे की, वास्तविक विभूती सांगण्यात भगवंताचे तात्पर्य, एखाद्या वस्तू, व्यक्ती, इत्यादीची महत्ता सांगण्यात नाही, तर आपले चिंतन करविण्यात आहे. म्हणून गीता आणि भागवत दोन्हीही ठिकाणी सांगितलेल्या विभूतीत भगवंताचे चिंतन करणेच मुख्य आहे. या दृष्टीने जेथे-जेथे विशेषता दिसून येईल, तेथे-तेथे वस्तू, व्यक्ती इत्यादीची विशेषता न पाहता, केवळ भगवंताचीच विशेषता समजली पाहिजे आणि भगवंताकडेच वृत्ती वळली पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—संपूर्ण प्राण्यांच्या उत्पत्तीचे चार प्रकार आहेत. (१) **जरायुज**—जारासह उत्पन्न होणारे मनुष्य, गाय, म्हैस, मेंढी, शेळी इत्यादी, (२) **अण्डज**—अंड्यापासून उत्पन्न होणारे पक्षी, सर्प, खार, पाल इत्यादी, (३) **उद्भिज्ज**—पृथ्वीचा भेद करून वर निघणारे वृक्ष, लता, हरळी, गवत, धान्य इत्यादी आणि (४) **स्वेदज**—घामापासून उत्पन्न होणारे उवा; लिखा इत्यादी आणि वर्षाकाळात जमीनीतून उत्पन्न होणारे गांडूळ इत्यादी जीव. या चार स्थानांपासून **चौऱ्यांशी** लक्ष योनी उत्पन्न होतात. या योनींमध्ये दोन प्रकारचे जीव असतात—स्थावर आणि जंगम वृक्ष, लता, हरळी, गवत इत्यादी एकाच जागी राहणारे जीव 'स्थावर' आहेत आणि मनुष्य, पशू, पक्षी-इत्यादी चालणारे-फिरणारे जीव 'जंगम' आहेत. या जीवांमध्येही कोणी पाण्यात राहणारे, कोणी आकाशात राहणारे आणि कोणी जमीनीवर राहणारे आहेत. या चौऱ्यांशी लक्ष योनीशिवाय देवता, पितर, गंधर्व, भूत, प्रेत, पिशाच, ब्रह्मराक्षस, पूतना, बालग्रह इत्यादी अनेक योनी आहेत. या संपूर्ण योनींचे बीज अर्थात् मूळ कारण भगवान् आहेत. तात्पर्य अनंत ब्रह्मांडांमध्ये अनंत जीव आहेत, परंतु त्या सर्वांचे बीज एकच आहे! म्हणून सर्व रूपात एक भगवान्च आहेत—**'वासुदेवः सर्वम्'**.

* इदं गुणमयं विद्धि त्रिविधं मायया कृतम्॥ (श्रीमद्भगवत् ११।२८।७)

† यच्च किञ्चिज्जगत्सर्वं दृष्यते श्रूयतेऽपि वा। अंतर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायण: स्थित:॥ (महानारायणोपनिषद ११।६)
"हे जे काही जगत् पाहण्यात अथवा ऐकण्यात येत असते, या सर्वांना बाहेरुन आणि आंतून व्यापून भगवान् नारायण स्थित असतात."

जसे बीजापासून शेती (धान्य) होते, तसेच एका भगवंतापासून हा संपूर्ण संसार झाला आहे. ज्याप्रमाणे बाजरीपासून बाजरीच उत्पन्न होते, गव्हापासून गहूच पैदा होतो, पशूपासून पशूच होतात, मनुष्यापासून मनुष्यच होतात, त्याचप्रमाणे भगवंतापासून भगवान्च होतात अर्थात् संसाररूपाने भगवान्च प्रकट होतात! जसे सोन्यापासून तयार झालेले अलंकार सोनेरूपच असतात, लोखंडापासून तयार झालेली अवजारे लोखंडरूपच असतात, मातीपासून बनविलेली भांडी मातीरूपच असतात, कापसापासून तयार झालेली वस्त्रे कापूसरूपच असतात, तसेच भगवंतापासून होणारा संसारही भगवद्रूपच आहे!

लौकिक बीजापासून तर एकाच प्रकारची शेती (धान्य) उत्पन्न होते. जसे गव्हाच्या बीजापासून गहूच उत्पन्न होतात, असे होत नाही की, एकाच बीजापासून गहूही उत्पन्न होतील, बाजरीही उत्पन्न होईल, मटकीही उत्पन्न होईल, मूगही उत्पन्न होईल. सर्वांचे बीज वेग-वेगळे असते. परंतु भगवान्रूप बीज इतके विलक्षण बीज आहे की, त्या एका बीजापासूनच अनेक प्रकारची सृष्टी निर्माण होते. (गीता १४। ४) आणि सर्व प्रकारची सृष्टी निर्माण झाल्यावरही त्यात काही विकृती येत नाही, ते जसेच्या तसे राहते. कारण ते बीज, अव्यय आहे (गीता ९। १८) आणि सनातन आहे (गीता ७। १०).

***संबंध**—आता पुढील श्लोकात आपल्या दिव्य विभूतींच्या कथनाचा उपसंहार करत आहेत.*

## नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप।
## एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया॥ ४०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप** | = हे परंतप अर्जुन! | **न, अस्ति** | = नाही | **एषः** | = हा |
| **मम** | = माझ्या | **मया** | = मी (तुला माझ्या) | **तु** | = तर (केवळ) |
| **दिव्यानाम्** | = दिव्य | **विभूतेः** | = विभूतींचा जो | **उद्देशतः** | = संक्षेपाने |
| **विभूतीनाम्** | = विभूतींचा | **विस्तरः** | = विस्तार | | नाममात्र |
| **अन्तः** | = अंत | **प्रोक्तः** | = सांगितला आहे, | | सांगितला आहे. |

***व्याख्या***— **मम दिव्यानां *विभूतीनाम्**—दिव्य शब्द अलौकिकता, विलक्षणेचा द्योतक आहे. साधकाचे मन जेथे जाईल, तेथेच भगवंताचे चिंतन करण्यानेही दिव्यता तेथेच प्रगट होईल; कारण भगवंतासारखे कोणी दिव्य नाहीच. देवता ज्या दिव्य म्हटल्या जातात, त्याही नित्य भगवंताच्या दर्शनाची इच्छा करतात—"**नित्यं दर्शनकाङ्क्षिणः**" (११।५२) यावरुन हे सिद्ध होते की, दिव्याती दिव्य तर एक भगवानच आहेत. म्हणून भगवंताच्या जितक्या काही विभूती आहेत तत्त्वतः त्या सर्व दिव्य आहेत. परंतु साधकासमोर त्या विभूतींची दिव्यता तेव्हाच प्रगट होते, जेव्हा साधकाचा उद्देश केवळ एका भगवत्- प्राप्तीचाच असतो आणि भगवत्तत्त्व जाणण्यासाठी राग-द्वेषरहित होऊन त्या विभूतीत केवळ भगवंताचेच चिंतन साधक करत असतो.

**नान्तोऽस्ति**—भगवंताच्या दिव्य विभूतींचा अंत लागत नाही, कारण भगवान् अनंत आहेत तर त्यांच्या विभूती, गुण, लीला इत्यादीही अनंत आहेत "**हरि अनंत हरि कथा अनंता**" (मानस १।१४०।५) म्हणून भगवंतांनी विभूतींच्या उपक्रमात आणि उपसंहारात दोन्हीही ठिकाणी म्हटले आहे की, माझ्या विभूतींचा अंत लागत नाही. श्रीमद्भागवतात भगवंतांनी आपल्या विभूतींच्या विषयात म्हटले आहे की, "माझ्याकडून परमाणूंची संख्या काळाने मोजली जाऊ शकेल, परंतु कोट्यावधी ब्रह्मांडे रचणाऱ्या माझ्या विभूतींचा अंत लागू शकणार नाही"†

भगवान् अनंत, असीम, अगाध आहेत. संख्येच्या दृष्टीने भगवंत "अनंत" आहेत; अर्थात् त्यांची गणना परार्धापर्यंतही होऊ शकत नाही. सीमेच्या दृष्टीने भगवान् "असीम" आहेत. सीमा दोन प्रकारची असते. काळकृत आणि देशकृत. अमुक वेळी उत्पन्न झाला, अमुक वेळ पर्यंत राहील. ही

* अर्जुनाने प्रथम प्रार्थनेच्या रूपात विचारले होते—वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः (१०।१६), भगवंतांनी विभूतींचे वर्णन आरंभ करताना म्हटले "हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः" (१०।१९), आणि येथे त्याचा उपसंहार करून भगवान् म्हणतात "नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप" (१०।४०). अशा प्रकारे प्रार्थने (प्रश्ना) मध्ये, उपक्रमामध्ये आणि उपसंहारामध्ये तिन्ही ठिकाणी "दिव्य" पदाचे ऐक्य आहे.

† संख्यानं परमाणूनां कालेन क्रियते मया। न तथा मे विभूतीनां सृजतोऽण्डानि कोटिशः॥ (श्रीमद्भागवत् ११।१६।३९)

कालकृत सीमा झाली आणि येथून तेथपर्यंत—ही देशकृत सीमा झाली. भगवान् अशा सीमेत बांधले गेलेले नाहीत. तळाच्या दृष्टीने भगवान् ''अगाध'' आहेत. अगाध शब्दात ''गाध'' तळाला म्हणतात. जसे पाण्याच्या खाली तळ असतो. ज्याला तळ नाहीच असा अथांग खोल असा अगाध याचा अर्थ झाला.

**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया**—अठराव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले आहे की, आपण आपल्या दिव्य विभूतींना विस्ताराने सांगावे, तर उत्तरात भगवान् म्हणतात की, माझ्या विभूतींच्या विस्ताराचा अंत नाही. असे म्हणूनही भगवंतांनी अर्जुनाच्या जिज्ञासेमुळे, कृपेने आपल्या विभूतींचे विस्ताराने वर्णन केले. परंतु हा विस्तार केवळ लौकिक दृष्टीनेच आहे. म्हणून भगवान् येथे म्हणत आहेत की, मी येथे जो विभूतींचा विस्तार केला आहे, तो विस्तार केवळ तुझ्या दृष्टीनेच आहे. माझ्या दृष्टीने तर हा विस्तारही वास्तविक फारच संक्षेपाने (नाममात्र) आहे कारण माझ्या विभूतींचा अंत लागत नाही.

या अध्यायात सांगितलेल्या संपूर्ण विभूती सर्वांच्या कामी येत नाहीत; तर अशा अनेक दुसऱ्या विभूतीही कामी येतात, ज्यांचे येथे वर्णन झालेले नाही. म्हणून साधकाने जेथे जेथे एखाद्या विशेषतेकडे पाहून मन ओढले जाते; तेथे तेथे त्या विशेषतेला भगवंताचीच समजावे आणि भगवंताचेच चिंतन करावे. मग ती विभूती येथे भगवंताकडून सांगितली गेलेली असो अथवा नसो!

**परिशिष्ट भाव**—गीतेमध्ये भगवंताने कारणरूपाने सतरा विभूती (७। ८-१२), कार्य-कारणरूपाने सदतीस विभूती (९। १६-१९). भावरूपाने वीस विभूती (१०। ४-५), व्यक्तिरूपाने पंचवीस विभूती (१०। ६), मुख्यरूपाने आणि अधिपतिरूपाने एक्याऐंशी विभूती (१०। २०-३८), साररूपाने एक विभूती (१०। ३९) आणि प्रभावरूपाने तेरा विभूती (१५। १२-१५) सांगितल्या आहेत. या सर्वांचे तात्पर्य हेच आहे की, एका भगवंताशिवाय काही नाही. सर्व रूपांमध्ये एक भगवान्च भगवान् आहेत. सर्व भगवंताचेच समग्ररूप आहे. असत् परिवर्तनशील आहे आणि सत् अपरिवर्तनशील आहे. ह्या सत् (परा) आणि असत् (अपरा)—दोन्हीही भगवंताच्या विभूती आहेत— **'सदसच्चाहमर्जुन'** (गीता ९। १९). तात्पर्य, विभूतिरूपाने साक्षात् भगवान्च आहेत. म्हणून आपले ज्याच्यात आकर्षण होते, ते आकर्षण वास्तविक भगवंताचेच आहे. परंतु भोगबुद्धीमुळे ते आकर्षण भगवत्प्रेमात परिणत न होता काम, आसक्तीत परिणत होते, जे संसारात बांधणारे आहे.

गीतेमध्ये भगवंताने ब्रह्मालाही **'माम्'** (आपले स्वरूप) म्हटले आहे (८। १३), देवतांनाही **'माम्'** म्हटले आहे (९। २३), इंद्रालाही **'माम्'** म्हटले आहे (९। २०), उत्तम गतीलाही **'माम्'** म्हटले आहे (७। १८), क्षेत्रज्ञालाही (जीवात्म्यालाही) **'माम्'** म्हटले आहे (१३। २), सर्वांच्या शरीरात राहणाऱ्या अंतर्यामीलाही **'माम्'** म्हटले आहे (१६। १८), संपूर्ण प्राण्यांच्या बीजालाही **'माम्'** म्हटले आहे (७। १०) इत्यादी. तात्पर्य सगुण-निर्गुण, साकार-निराकार तसेच मनुष्य, देवता, पशू, पक्षी, भूत, प्रेत पिशाच इत्यादी जे काहीही आहे ते सर्व मिळून भगवंताचेच समग्ररूप आहे अर्थात् सर्व भगवंताच्याच विभूती आहेत, त्यांचेच ऐश्वर्य आहे. *ह्या सर्वच्या सर्व विभूती अव्यय (अविनाशी) आहेत.

या ठिकाणी शंका येते की, जर संपूर्ण संसारच भगवत्स्वरूप आहे, तर मग विभूती-वर्णनाचे तात्पर्य काय आहे? याचे समाधान असे आहे की, अर्जुनाचा प्रश्नसुद्धा हाच होता की, मी कुठे-कुठे आपले चिंतन करू? (१०। १७). वास्तविक सर्व काही भगवंताचे समग्ररूपच आहे, परंतु मनुष्याला ज्या वस्तूत विशेषता दिसते, त्या वस्तूत भगवंताला पाहणे, त्यांचे चिंतन करणे सोप पडते. कारण मनात त्याची विशेषता अंकित राहिल्यामुळे मन स्वतः तिकडे धावते. म्हणूनच भगवंताने आपल्या विभूती वर्णन केल्या आहेत. मुख्य-मुख्य विभूतींचे वर्णन करताना भगवंताने म्हटले आहे की, संपूर्ण प्राण्यांचा तसेच संपूर्ण सृष्टीचा आदि, मध्य आणि अंत मीच आहे (१०। २०, ३२), संपूर्ण प्राण्यांचे बीज मीच आहे, माझ्याशिवाय कोणताही जर-अचर प्राणी नाही (१०। ३९) आणि संपूर्ण जगत् माझ्या एका अंशात स्थित आहे (१०। ४२), मग भगवंताशिवाय बाकी काय राहिले? काहीही शिल्लक राहिले नाही. सर्व काही भगवान्च झाले—**'वासुदेवः सर्वम्'** (गीता ७। १९).

गीतेत विभूती-वर्णन गौण नाही, तर हे भगवत्प्राप्तीचे मुख्य साधन आहे, ज्याची सिद्धी **'वासुदेवः सर्वम्'** मध्ये होते.

---

* सर्वे च देवा मनवस्समस्तास्सप्तर्षयो ये मनुसूनवश्च।
इन्द्रश्च योऽयं त्रिदशशभूतो विष्णोरशेषास्तु विभूतयस्ताः॥ (विष्णुपुराण ३। १। ४६)
'समस्त देवता, मनु, सप्तर्षि तसेच मनुपुत्र आणि देवतांचे अधिपती इन्द्रगण आणि यांच्याशिवाय जे काही आहे—ह्या सर्वच्या सर्व भगवान् विष्णुच्याच विभूती आहेत.'

कारण संसारात जेथे कोठे आपल्याला कोणती विशेषता दिसली, तर ती भगवंताचीच विशेषता मानल्याने आपले आकर्षण त्या वस्तू, व्यक्ती इत्यादीत न होता भगवंतातच होईल. जडतेचे आकर्षण, प्रियता हीच मनुष्याला बांधणारी आहे—'**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**' (गीता १३। २१). म्हणून विभूती वर्णनाचे तात्पर्य संसाराची सत्ता, महत्ता आणि प्रियता यांना हटवून मनुष्याला '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव करविणे आहे, जे गीतेचे मुख्य प्रयोजन आहे.

संसाराची सत्ता, महत्ता आणि संबंध हेच मनुष्याला बांधणारे आहेत. म्हणून संसारात जेथे मनुष्याचे अधिक आकर्षण होते तेथे त्याची भोगबुद्धी न होता भगवद्‌बुद्धी होईल. त्यामुळे त्याच्या अंतःकरणात संसाराची सत्ता, महत्ता आणि संबंध न होता भगवंतांची सत्ता, महत्ता आणि संबंध होईल.*

***संबंध**—अठराव्या श्लोकात अर्जुनाने भगवंताला विभूती आणि योग सांगण्याविषयी प्रार्थना केली होती. यावर प्रथम भगवंतानी आपल्या विभूती सांगितल्या आणि आता पुढील श्लोकात योग सांगतात.*

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम्॥ ४१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्, यत्** | = जे जे | **सत्त्वम्** | = प्राणी व पदार्थ आहेत, | **तेजः** | = तेजाच्या (योग अर्थात् सामर्थ्याच्या) |
| **विभूतिमत्** | = ऐश्वर्ययुक्त | **तत्, तत्** | = ते ते | **अंश सम्भवम्** | = अंशाने उत्पन्न झालेले |
| **श्रीमत्** | = शोभायुक्त | **त्वम्** | = तू | **अवगच्छ** | = जाण. |
| **वा** | = आणि | **मम, एव** | = माझ्याच | | |
| **ऊर्जितम्** | = बलयुक्त | | | | |

*व्याख्या*— **यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा**— संपूर्ण संसारात जेथे कोठे सजीव-निर्जीव वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, गुण, भाव, क्रिया, इत्यादीत जे काही ऐश्वर्य दिसून येईल, शोभा अथवा सौंदर्य दिसेल, बलवत्ता दिसेल, तसेच जी काही विशेषता, विलक्षणता, योग्यता दिसेल, त्या सर्वांना माझ्या तेजाच्याच कोणत्यातरी अंशापासून उत्पन्न झाले आहेत, असे समज. तात्पर्य, त्यांच्यात विलक्षणता, सामर्थ्य, माझ्या योगानेच, माझ्या प्रभावानेच आलेली असते, असे तू समज. "**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम्**" माझ्याशिवाय अन्यत्र कोठेही, कोणतीच विलक्षणता नाही.

मनुष्याला जिथे-जिथे विशेषता दिसेल तिथे तिथे भगवंताचीच विशेषता समजून भगवंताचेच चिंतन झाले पाहिजे. जर भगवंताला सोडून दुसऱ्या वस्तू, व्यक्ती इत्यादीची विशेषता दिसत असेल, तर ते पतनाला कारणीभूत आहे. जसे पतिव्रता स्त्री आपल्या मनात पतीशिवाय दुसऱ्या कोणाची विशेषता ठेवत असेल, तर तिचे पातिव्रत्य भंग होते. त्याचप्रमाणे भगवंताशिवाय दुसऱ्या कोण्या वस्तूच्या विशेषतेकडे मन ओढत असेल, तर व्यभिचार दोष येतो; अर्थात् भगवंताविषयीच्या अनन्यभाव या व्रताचा भंग होतो.

संसारात लहानात-लहान, मोठ्यात-मोठी, वस्तू, व्यक्ती, क्रिया इत्यादीत जी काही महत्ता, सुंदरता, सुखरूपता दिसत असेल आणि जी काही लाभरूपता, हितरूपता दिसत असेल, ती वास्तविक सांसारिक वस्तूची नाहीच. जर त्या वस्तूची असती तर ती सर्व वेळीच राहिली असती आणि सर्वांना दिसली असती. परंतु ती सर्व काळी दिसत नाही आणि सर्वांना दिसत नाही. यावरुन सिद्ध होते की, ते या वस्तूचे नाहीच. तर मग कोणाचे आहे? त्या वस्तूचा जो आधार आहे, त्या परमात्म्याचे आहे. त्या परमात्म्याची झलकच त्या वस्तूत, सुंदरता, सुखरूपता इत्यादी रूपाने दिसत असते. परंतु जेव्हा मनुष्याची वृत्ती परमात्म्याच्या महिमेकडे न जाता त्या वस्तूकडेच जाते, तेव्हा तो संसारात फसतो. संसारात फसला तर त्याला संसारापासून काही मिळत नाही आणि त्याची तृप्तीही होत नाही. यात सुख नाही, ह्याने तृप्ती होत नाही—असा अनुभव असूनही मनुष्याचा वस्तू इत्यादीत असलेला भ्रम नष्ट होत नाही. मनुष्याने, प्रत्येक क्षणाला नाश होणाऱ्या वस्तूत जे सुख दिसते, ते त्याचे कसे असू शकेल असे विचारपूर्वक पाहिले

* नरेष्वभीक्ष्णं मद्भावं पुंसो भावयतोऽचिरात्।
स्पर्धाऽसूयातिरस्काराः साहङ्कारा वियन्ति हि॥ (श्रीमद्भा० ११। २९। १५)
'जेव्हा भक्ताचा संपूर्ण स्त्री-पुरुषांमध्ये निरंतर माझाच भाव होतो अर्थात् त्यात मलाच पाहतो, तेव्हा लवकरच त्याच्या चित्तातून ईर्ष्या, दोषदृष्टी, तिरस्कार इत्यादी दोष अहंकारसहित संपूर्णपणे नाहीसे होतात.'

पाहिजे. ती वस्तू प्रत्येक क्षणाला नष्ट होत आहे, तर त्यात दिसणारी सुंदरता, महत्ता त्या वस्तूची कशी होऊ शकते?

जसे विजेच्या संबंधाने रेडियो बोलतो, तेव्हा मनुष्याला वाटते बघा रेडियो कसा आवाज करतो. परंतु वास्तविक त्या रेडियोत जी काही शक्ती असते ती सर्व विजेचीच असते. विजेचा संबंध नसल्यास केवळ यंत्रापासून आवाज काढला जाऊ शकत नाही. अज्ञानी व्यक्ती तर त्या शक्तीला यंत्राचीच मानतो परंतु जाणकार माणूस त्या शक्तीला विजेचीच मानतो. त्याचप्रमाणे कोणत्याही वस्तू, व्यक्ती, पदार्थ, क्रिया इत्यादीत जी काही विशेषता दिसत असेल, तिला अज्ञानी मनुष्य तर त्या वस्तू, व्यक्ती इत्यादिचीच मानत असतो; परंतु जाणकार माणूस त्या विशेषतेला भगवंताचीच मानत असतो.

याच अध्यायाच्या आठव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, सर्व माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि सर्वात माझीच शक्ती आहे. यात भगवंताचे तात्पर्य हे आहे की, तुला जेथे-कोठे, जी-काही विशेषता, महत्ता, सुंदरता, बलवता, इत्यादी दिसेल, ती सर्व माझीच आहे त्यांची नव्हे. एक वेश्या फारच सुंदर स्वरात गात होती, ते ऐकून एक संत मस्त झाले की, पहा! भगवंतांनी कसा कंठ दिला आहे, किती सुंदर आवाज दिला आहे. त्यावेळी संतांची दृष्टी वेश्येवर गेली नाही, तर भगवंताकडेच गेली की, हिच्या कंठात जे आकर्षण आहे, गोडी आहे, ती भगवंताची आहे. तसेच एखादे फूल दिसले तर, खुश व्हावे की, वारेवा! भगवंतानी यात किती सौंदर्य भरले आहे! एखादा कोणाला उत्तम रीतीने शिकवत असेल तर उत्तम शिकविण्याची शक्ती भगवंताची आहे, शिकविणाऱ्याची नव्हे. देवतांना बृहस्पती आवडतात, रघुवंशीयांना वसिष्ठजी आवडतात. कोणाला सिंहात विशेषता दिसते, तर कोणाला रुपये फार प्रिय वाटतात. तर त्यात ज्या शक्ती, महत्ता, विशेषता इत्यादीला अनुसरून आकर्षण, प्रियता, ओढ होत आहे; ती शक्ती, महत्ता, इत्यादी भगवंताचीच आहे, त्यांची आपली नव्हे. अशा प्रकारे जेथे-कोठे, ज्या कशात, विशेषता दिसेल ती भगवंताचीच दिसली पाहिजे. म्हणून भगवंतांनी अनेक प्रकारच्या विभूती सांगितल्या आहेत. याचे तात्पर्य, त्या विभूतीत श्रद्धा, आवडीनुसार आकर्षण प्रत्येकाचे वेगवेगळे राहील, सर्वांना विभूती एकसारख्या चांगल्या वाटणार नाहीत, परंतु त्या सर्वात शक्ती भगवंताची असते.

जरी ज्या कोणात जी काही विशेषता आहे, ती परमात्म्याची आहे; तरीपण ज्यापासून आपल्याला लाभ झाला आहे अथवा होत आहे; त्यांचे आपण अवश्य कृतज्ञ व्हावे, त्यांची सेवा करावी. परंतु त्यांची व्यक्तिगत विशेषता मानून फसू नये. ही सावधानी बाळगावी.

## विशेष गोष्ट

भगवंतांनी वीसाव्या श्लोकापासून एकोणचाळीसाव्या श्लोकापर्यंत जितक्या विभूती सांगितल्या त्यात प्राय: **"अस्मि"** (मी आहे) पदाचा प्रयोग केला आहे. केवळ तीन ठिकाणी चोवीसाव्या आणि सत्तावीसाव्या श्लोकात **"विद्धि"** तसेच येथे एक्केचाळीसाव्या श्लोकात **"अवगच्छ"** पदाचा प्रयोग करून "जाणून घेण्याची" गोष्ट सांगितली.

**"अस्मि"** (मी आहे) पदाचा प्रयोग करण्याचे तात्पर्य, विभूतींच्या मूळ तत्त्वाकडे लक्ष वेधण्यात आहे की, या सर्व विभूतींच्या मूळात मीच आहे. कारण सतराव्या श्लोकात अर्जुनाने विचारले होते की, मी आपल्याला कसे जाणून घेऊ! त्यावेळी भगवंतांनी **"अस्मि"** चा प्रयोग करून सर्व विभूतीत आपणाला समजून घेण्याविषयी म्हटले.

दोन ठिकाणी **"विद्धि"** पदाचा प्रयोग करण्याचे तात्पर्य, मनुष्याला सचेत करण्यात, सावध करण्यात आहे. मनुष्य दोन गोष्टींनी सावधान होत असतो. ज्ञानाने आणि शासनाने! ज्ञान गुरूकडून मिळत असते आणि शासन स्वयं राजा करत असतो. म्हणून चोवीसाव्या श्लोकात जेथे गुरू बृहस्पतीचे वर्णन आले आहे, तेथे **"विद्धि"** म्हणण्याचे तात्पर्य; तू गुरूकडून माझ्या विभूतीच्या तत्त्वाला योग्य रीतीने समजून घे. विभूतींच्या तत्त्वाना समजून घेण्याचे फळ माझ्या ठिकाणी दृढ भक्ती होते हे आहे (१०।७). सत्तावीसाव्या श्लोकात जेथे राजाचे वर्णन आले आहे, तेथे **"विद्धि"** म्हणण्याचे तात्पर्य; तू राजाच्या शासनद्वारा उन्मार्गापासून परावृत्त होऊन सन्मार्गास लागावे अर्थात् आपले जीवन शुद्ध बनवून घ्यावे. गुरू प्रेमाने समजावितात आणि राजा बलाने, भयाने समजावित असतो. गुरूच्या समजाविण्यात उद्धाराची गोष्ट मुख्य राहत असते आणि राजाच्या समजाविण्यात लौकिक मर्यादेचे पालन करण्याविषयी मुख्यता असते.

सत्तावीसाव्या श्लोकात "उच्चैश्रवा" आणि "ऐरावत" याचे जे वर्णन आले आहे, ते दोन्ही राजाच्या वैभवाचे उपलक्षण आहेत. कारण घोडे, हत्ती इत्यादी राजाचे ऐश्वर्य असते आणि ऐश्वर्यवान् राजाच शासन करत असतो. म्हणून त्या श्लोकात **"विद्धि"** पदाचा प्रयोग खास करून राजासाठीच केला असल्याचे लक्षात येते.

येथे एक्केचाळीसाव्या श्लोकात जे **"अवगच्छ"** पद आले आहे त्याचा अर्थ वास्तविकतेने समजून घेणे की, जी काही विशेषता दिसून येते, ती वस्तुत: भगवंताचीच आहे, असा आहे.

अशाप्रकारे दोन वेळा "**विद्धि**" आणि एक वेळ "**अवगच्छ**" पद देण्याचे तात्पर्य गुरू आणि राजाकडून समजावूनही, जोपर्यंत मनुष्य स्वतः त्यांच्या वचनाला वास्तविकतेच्या दृष्टिकोनातून समजून घेत नाही, त्यांचे वचन मान्य करत नाही, तोपर्यंत गुरूचे ज्ञान आणि राजाचे शासन त्याच्या कामी येत नाही. शेवटी तर त्याला स्वतः-लाच मान्य करून घ्यावे लागेल आणि तेच त्याच्या कामी येईल.

**परिशिष्ट भाव**—पूर्वी सांगितल्या गेलेल्या विभूतींशिवायही साधकाला स्वतःला ज्याच्यात व्यक्तिगत आकर्षण जाणवते तेथे तेथे त्याने भगवंतालाच पहावे अर्थात् ती विशेषता भगवंताचीच आहे—अशी दृढतेने धारणा करावी. भगवद्बुद्धीची दृढता झाल्यास संसार लुप्त होईल. जसे सोन्याच्या अलंकारात सोनेबुद्धी झाल्यास अलंकार लुप्त होतात, साखरेच्या खेळण्यात साखरेची बुद्धी झाल्यास खेळणी लुप्त होतात. कारण वास्तविक संसार नाहीच. केवळ जीवाचे आपल्या राग-द्वेषाने संसाराला धारण केले आहे—'**ययेदं धार्यते जगत्**' (गीता ७।५). सार गोष्ट ही आहे की, कोणत्याही प्रकारे साधकाला शेवटी '**वासुदेवः सर्वम्**' (सर्व काही भगवान्च आहेत) यातच पोहचायचे आहे. म्हणूनच भगवंताने अरुंधती न्यायाने '**वासुदेवः सर्वम्**' चा अनुभव करविण्यासाठीच विभूतींचे वर्णन केले आहे. कारण विभूतीत भगवंताला पाहण्याने मग सर्व ठिकाणी भगवान् दिसू लागतील अर्थात् वस्तुरूपाने आकर्षण न राहता भगवद्रूपाने आकर्षण होईल.

मनुष्यात जी काही विशेषता, विलक्षणता येते, ती सर्व वास्तविक भगवंतापासूनच येते. जर भगवंतामध्ये विशेषता, विलक्षणता नसती तर ती मनुष्यात कशी आली असती? जी वस्तू अंशीत नाही, ती अंशात कशी येऊ शकते? मनुष्याकडून हीच चूक होते की, तो त्या विशेषतेला स्वतःची विशेषता मानून अभिमान करतो आणि जेथून ही विशेषता आली आहे तिकडे लक्ष देत नाही!

सृष्टीची प्रत्येक वस्तू, व्यक्ती इत्यादी प्रत्येक क्षणी नाशाकडे जात आहे. आपण ज्या वस्तू, व्यक्ती इत्यादीत सुंदरता, बलवत्ता इत्यादी विशेषता पाहतो, त्या एके दिवशी नष्ट होतात. म्हणून सृष्टीची प्रत्येक वस्तू जणू हा क्रियात्मक उपदेश देत आहे की, माझ्याकडे पाहू नका, मी तर राहणार नाही, मला बनविणाऱ्याकडे आणि माझ्यात असलेल्याकडे पहा. माझ्यात जे सौंदर्य, सामर्थ्य, विलक्षणता इत्यादी दिसत आहे, ते माझे नाही, तर त्याचे आहे. असे जाणल्यावर मग वस्तू, व्यक्ती इत्यादीत आपले आकर्षण राहणार नाही आणि प्रत्येक वस्तू, व्यक्ती इत्यादीत भगवंताचेच दर्शन होईल. असे झाल्यास मग भोग होणार नाही तर आपोआप योग (भगवंताशी नित्यसंबंध) होईल.

परमात्मा संपूर्ण शक्ती, कला, विद्या इत्यादींचे विलक्षण भांडार आहेत. शक्ती जड प्रकृतीत राहू शकत नाहीत, तर चिन्मय परमात्मतत्त्वातच राहू शकतात. ज्या ज्ञानाने क्रिया होत आहे ते ज्ञान जडात कसे राहू शकते? जर असे मानले की, सर्व शक्ती प्रकृतीतच आहेत तरीही हे मानावे लागेल की, त्या शक्तींचे प्राकट्य आणि उपयोग (सृष्टि रचना इत्यादी) करण्याची योग्यता प्रकृतीत नाही. जसे कम्प्यूटर जड असूनही अनेक चमत्कारिक कार्य करते परंतु त्याला निर्माण करणारा आणि त्याचे संचालन करणारा चेतन (मनुष्य) आहे. मनुष्यद्वारा निर्मित, शिक्षित आणि संचालित झाल्याशिवाय ते कार्य करू शकत नाही. कॉम्प्यूटर स्वतःसिद्ध नाही, तर कृत्रिम (बनविलेले) आहे परंतु परमात्मा स्वतःसिद्ध आहेत.

जर परमात्म्यात विशेषता नसती तर ती संसारात कशी आली असती? जी विशेषता बीजात असते, तीच वृक्षातही येते. जी विशेषता बीजात नाही ती वृक्षात कशी येईल? त्याच परमात्म्याची कवित्वशक्ती कवीत येते, त्याचीच वक्तृत्वशक्ती वक्त्यात येते, त्याचीच लेखनशक्ती लेखकात येते, त्याचीच दातृत्वशक्ती दात्यात येते. मुक्ती, ज्ञान, प्रेम इत्यादी सर्व त्या परमात्म्याचीच देन आहे. हे प्रकृतीचे कार्य नव्हे. जर 'मी मुक्तस्वरूप आहे'—ही गोष्ट सत्य आहे तर मग बंधन कोठून आले, कसे आले, केव्हा आले आणि का आले? जर 'मी ज्ञानस्वरूप आहे'—ही गोष्ट सत्य आहे तर मग अज्ञान कोठून आले, कसे आले केव्हा आले आणि का आले? सूर्यामध्ये अमावस्येची रात्र कशी येऊ शकते? वास्तविक ज्ञान आहे तर परमात्म्याचे परंतु मानले आपले, म्हणूनच अज्ञान आले आहे.* मी ज्ञानस्वरूप आहे, ज्ञान माझे आहे—हे 'मी' आणि 'माझे' (अहंता-ममता) हेच अज्ञान आहे.†

---

* ज्ञान अथवा जाणण्याची शक्ती प्रकृतीत नाही. प्रकृती एकरस राहणारी नाही, तर प्रत्येक क्षणाला बदलणारी आहे. जर प्रकृतीत ज्ञान असेल तर ते ज्ञानही एकरस न राहता बदलणारेच असेल. जे ज्ञान उत्पन्न होईल ते निरंतर राहणार नाही, तर अनित्य असेल. जर कोणी मानले की, ज्ञान प्रकृतीतच आहे तर त्याच प्रकृतीला आपण परमात्मा म्हणतो, केवळ शब्दात फरक आहे! तात्पर्य हे झाले की, ज्ञान प्रकृतीत नाही, जर आहे तर तोच परमात्मा आहे.

† मैं अरु मोर तोर तैं माया। जेहिं बस कीन्हे जीव निकाया॥ (मानस, अरण्य० १५।१)

ज्याच्याकडून मुक्ती, ज्ञान, प्रेम इत्यादी प्राप्त झाले आहे, त्याच्याकडे दृष्टी न राहिल्यामुळेच असे जाणवते की, मुक्ती माझी आहे, ज्ञान माझे आहे, प्रेम माझे आहे. ही तर देणाऱ्याची (परमात्म्याची) विलक्षणता आहे की, घेणाऱ्याला ती वस्तू आपलीच वाटते! परमात्म्याची ही विलक्षणता महान आदर्श आहे, ज्याचा साधकांनी आदर केला पाहिजे. मनुष्याकडूनही फार मोठी चूक होते की, तो प्राप्त झालेल्या वस्तूला तर आपली मानतो परंतु जेथून ती प्राप्त झाली आहे, त्या देणाऱ्याकडे त्याची दृष्टी जातच नाही! तो प्राप्त झालेल्या वस्तूला तर पाहतो परंतु देणाऱ्याला तर पाहतच नाही. कार्याला तर पाहतो, परंतु ज्याच्या शक्तीने कार्य झाले त्या कारणाला पाहतच नाही! वास्तविक वस्तू आपली नाही तर देणारा आपला आहे.

भगवंताने दिलेल्या सामर्थ्यानेच मनुष्य कर्मयोगी होतो. त्याने दिलेल्या ज्ञानानेच मनुष्य ज्ञानयोगी होतो आणि त्याने दिलेल्या प्रेमानेच मनुष्य भक्तियोगी होतो. मनुष्यात जी काही विलक्षणता, विशेषता दिसून येते ती सर्वची सर्व त्याने दिलेली असते. सर्व काही देऊनही तो स्वतःला प्रकट करीत नाही—हा त्याचा स्वभाव आहे.

***संबंध****—येथपर्यंत अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देऊन आता भगवान् आपल्याकडून महत्त्वाची गोष्ट सांगत आहेत.*

## अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन।
## विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्॥ ४२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अथवा** | = अथवा | | आहे, (कारण) | **जगत्** | = जगताला |
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **अहम्** | = मी | **विष्टभ्य** | = व्याप्त करून |
| **तव** | = तुला | **एकांशेन** | = (आपल्या | **स्थितः** | = स्थित आहे |
| **एतेन** | = अशाप्रकारे | | कोणत्या) | | अर्थात् अनंत |
| **बहुना** | = पुष्कळ गोष्टी | | एका अंशाने | | ब्रह्मांड माझ्या |
| **ज्ञातेन** | = जाणून घेण्याची | **इदम्** | = ह्या | | कोण्या एका |
| **किम्** | = काय आवश्यकता | **कृत्स्नम्** | = संपूर्ण | | अंशात आहेत. |

***व्याख्या*— 'अथवा'**—हे अव्यय पद देऊन भगवंत अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, तू जो प्रश्न केला होतास, त्यानुसार उत्तर दिलेच आहे. आता मी माझ्याकडून तुझ्यासाठी एक विशेष महत्त्वाचे सार तत्त्व सांगतो.

**बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन**—हे सखा! अर्जुन!, तुला अशा प्रकारे पुष्कळ जाणून घेण्याची काय आवश्यकता आहे? मी घोड्याचा लगाम आणि चाबूक हातात घेऊन तुझ्या समोर बसलेला आहे. दिसण्यात मी तर लहान दिसतो परंतु माझ्या या शरीराच्या कोण्या एका अंशात अनंत कोटी ब्रह्मांड, महासर्ग आणि महाप्रलय, दोन्ही अवस्थेत स्थित आहेत. त्या सर्वांना घेऊन मी तुझ्यासमोर बसलो आहे आणि तुझ्या आज्ञेचे पालन करत आहे. म्हणून असा असलेला मी जर तुझ्यासमोर स्वतः आहे, तर तुला पुष्कळ गोष्टी जाणून घेण्याची काय आवश्यकता आहे?

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्**—मी या संपूर्ण जगाला एका अंशाने व्यापून स्थित आहे—हे म्हणण्याचे तात्पर्य—भगवंताच्या कोणत्याही अंशात अनंत सृष्टी विद्यमान असतात—"**रोम रोम प्रति लागे कोटि कोटि ब्रह्मंड**" (मानस १।२०१) परंतु त्या सृष्टींनी भगवंताचा कोणताही भाग व्यापलेला नसतो. अर्थात् भगवंताच्या कोणत्याही अंशात, त्या सर्व सृष्टीं राहूनही तो भाग तसाच रिकामाच असतो. जसे प्रकृतीचा अत्यंत क्षुद्र अंश आपली बुद्धी असते. बुद्धीत कित्येक भाषा, कित्येक लिपी, कित्येक कला यांचे ज्ञान झाले तरीही, आपण असे म्हणू शकत नाही की, आपली बुद्धी अनेक भाषा इत्यादींच्या ज्ञानाने भरून गेली आहे. म्हणून आता दुसरी भाषा, लिपी इत्यादी जाणून घेण्यासाठी जागा राहिली नाही. तात्पर्य, बुद्धीत अनेक भाषा इत्यादींचे ज्ञान झाले तरी, बुद्धीत जागा रिकामीच राहत असते आणि कितीही भाषा इत्यादी शिकल्या तरीही बुद्धी भरली जाऊ शकत नाही. अशा प्रकारे जर प्रकृतीचा लहान असलेला अंश बुद्धीही, अनेक भाषा इत्यादींच्या ज्ञानाने भरत नाही, तर मग प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या, अनंत असीम आणि अगाध असलेल्या भगवंताचा एखादा अंश अनंत सृष्टींनी कसा भरू शकतो? तो तर बुद्धीच्याही सापेक्षात विशेषरूपाने रिकामा राहत असतो.

**विशेष भाव**—या श्लोकाचे तात्पर्य हे आहे की, भगवान्‌च जगतरूपाने स्थित आहेत. कारण व्याप्य आणि व्यापक, सूक्ष्म आणि महान, सत् आणि असत्—दोन्ही भगवान्‌च आहेत. भगवान् अनंत आहेत. म्हणूनच अनंत ब्रह्मांड त्यांच्या कोण्या एका अंशात स्थित आहेत—**'एकांशेन स्थितो जगत्'**.

भगवंताच्या कथनाचे तात्पर्य आपल्याकडे दृष्टी करविण्यात आहे की, सर्व काही मीच तर आहे! माझ्याकडे पाहिल्यावर मग कोणतीही विभूती बाकी राहणार नाही. जर संपूर्ण विभूतींचा आधार, आश्रय, प्रकाशक, बीज (मूळ कारण) मी तुझ्यासमोर बसलेलो आहे, तर मग विभूतींचे चिंतन करण्याची काय आवश्यकता आहे?

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामोच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्‌रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "विभूतियोग" नावाचा दहावा अध्याय पूर्ण झाला. ॥ १० ॥**

जेथे कोठे जी काही विशेषता दिसून येते, ती सर्व भगवंताचीच विभूती आहे असे मानल्याने भगवंताशी योगाचा (संबंध) अनुभव येतो. म्हणून दहाव्या अध्यायाचे नाव "विभूतियोग" असे आहे.

### दहाव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ दशमोऽध्यायः**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची सहा, श्लोकांची पांचशे छपन्न आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत अशाप्रकारे संपूर्ण पदांचा योग पाचशे अठ्ठयाहत्तर आहे

(२) "**अथ दशमोऽध्यायः**" ची सात, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची वीस, श्लोकांची एक हजार तीनशे चौवेचाळीस आणि पुष्पिकेची सेहेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एक हजार चारशे सतरा आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात तीन उवाच आहेत. दोन "**श्रीभगवानुवाच**" आणि एक "**अर्जुन उवाच**"

### दहाव्या अध्यायातील प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या बेचाळीस श्लोकांपैकी दुसऱ्या आणि पंचवीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न विपुला**", सातव्या श्लोकाच्या प्रथम चरणात तसेच पाचव्या आणि बत्तीसाव्या श्लोकांच्या तृतीय चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म विपुला**", आठव्या श्लोकाच्या प्रथम चरणात आणि सव्वीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ विपुला**", आणि सहाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र विपुला**" संज्ञेचे छन्द आहेत. बाकीचे छत्तीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदाच्या लक्षणांनी युक्त आहेत.